# धूम्रतरंग

[ उत्कृष्ट गुजगोष्टींचा संग्रह ]

प्रो० माधव काशिनाथ देशपांडे, एम्. ए.

कॉंटिनेंटल बुक-सर्व्हिस, पुणें २.

जून १९४२ १।।।- रुपये

# प्रास्ताविक

---o---

प्रस्तुत गुजगोष्टी-संग्रहाच्या नांवाची कल्पना चार वर्षांपूर्वी मीं प्रसिद्ध केलेल्या टीकाग्रंथांतील एका विधानावरून मला सुचली. प्रो. फडके यांच्यावर लिहिलेल्या ग्रंथांत 'गुजगोष्ट' या वाङ्मय-प्रकाराची चर्चा करतांना मीं म्हटलें होतें :

" आरामखुर्चींत पडून हातपाय समाधानानें पसरून शिगरेट शिलगवून मौजेनें धूम्रपान करितांना हवेंत सोडलेल्या **धूम्रतरंगा**सारखी आदर्श गुजगोष्ट असते. "

प्रस्तुत संग्रहांतील गुजगोष्टी आदर्श स्वरूपाच्या आहेत असें मला सुचवावयाचें नाहीं, हें अर्थातच सांगायला नकोच. त्याचें स्वरूप कसें आहे तें रसज्ञ वाचकांनीं ठरवावयाचें आहे. मात्र त्या वाचीत असतांना वाचकांची निराशा होणार नाहीं याबद्दल मला खात्री वाटते.

प्रस्तुत ग्रंथ इतक्या सुंदर रीतीनें छापून दिल्याबद्दल श्रीशिवाजी प्रिंटिंग वर्क्सचे मालक, पुणें म्युनिसिपालिटीचे सभासद व सुप्रसिद्ध समाजसेवक बाबुराव ढेरे यांचा मी अतिशय आभारी आहें.

२३ मे १९४२
टिळक रोड, पुणें २.

**माधव का. देशपांडे**

# अनुक्रमणिका



# धूम्रतरंग १

माझ्या मनांत हर्ष मावत नसला, अन्तःकरण उत्साहानं फुलून निघालेलं असलं, गात्रांत नवीनच चैतन्य स्फुरत असल्याचा उल्हासकारक अनुभव येऊं लागला कीं एक सिगरेट शिलगवून आरामशीरपणं खुर्चीत पाय पसरून पडल्या पडल्या हवेंत विरणाऱ्या धूम्रतरंगांची मौज पाहण्याची मला संवय आहे! जेव्हां माझ्या मनांत गढूळ विचारांचं सांडपाणी असतं, अगर हातापायांत ओतीव शिश्याप्रमाणं कसली तरी जड सुस्ती भरली असली कीं खोलींत येरझारा घालणं अगर कपडे करून फिरण्यासाठीं बाहेर पडणं मी पसंत करतों! पण जेव्हां मनांत आल्हाद दरवळलेला असतो, रोजचीं कोंवळीं सूर्यकिरणं नवीन कान्तीनं चमकल्याचा भास होऊं लागतो, वाऱ्यावर वहात आलेली संगीत लकेरी दिव्यत्वानं भारलेली वाटूं लागली, खिडकींतून दिसणारं रुक्ष आंब्याचं झाड पल्लवित झाल्याचा काव्याभास मनाला चाटूं लागला कीं रुपेरी पडद्यांत काळजीनं ठेवलेली हिमबिन्दु-

प्रमाणं निर्मल वर्णाची सिगरेट काढून तिला जळती लिपस्टिक करून मजेशीर झुरके घेत घेत आरामखुर्चीत पसरण्याचा मला छंद आहे !

—किती मौज वाटते असं पडल्या पडल्या हवेंत बागडणाऱ्या धूम्रतरंगांचे विलास पाहतांना !

तोंडांतून पसरलेला तो धुराचा लोट हवेंत विरतां विरतां सत्रा लाडकीं वळणं घेईल; निरनिराळीं रेखाचित्रं काढीत काढीत विरळ होतां होतां क्षणार्धांत नजरेला फसवून कुठल्या कुठं अदृश्य होईल ! कुठं जात असतील बरं हीं धूम्रवलयं ? माझ्या मनांतला आनंदाचा संदेश घेऊन उंच उंच अंतराळांत कुणाला तीं पोंचवीत तर नसतील ? कधीं कधीं आकाशाची मौज पाहत असतां चांदण्यांचं लुकलुकणं पाहिलं कीं वाटतं, यांना जर आपल्या भावना कळल्या तर किती बहार होईल ! आनंदी मनःस्थितींत असतांना माझ्या सिगरेटमधून निघणारे धूम्रतरंग उंच उंच भरारी घेत यांतल्या एखाद्या तारकेजवळ जाऊन कानाशीं कसली तरी नाजुक कुजबुज तर करत नसतील ? कुणीं सांगावं ?

—मनांत असं चान्दणं फुललं असलं कीं टेबलावर ठेविलेल्या फोटोंतील रुबाबदारपणं एक लठ्ठ चिरूट तोंडांत धरून मिष्किलपणानं हंसणाऱ्या चर्चिल-साहेबांच्या गोबऱ्या मुद्रेकडे मी पाहत बसतों व तो चिरूट, ओठांनीं तो पकडतांना त्यांचा झालेला गंमतीचा संकोच, मनपसंत तंबाखू ओढण्यास मिळाल्यामुळं डोळ्यांत उमटलेलं समाधान इत्यादींचा विचार करण्यांत माझं मन रमूं लागतं ! अशा वेळीं मधूनमधून एखादा प्रश्न मनाच्या खिडकी-जवळ डोकावून विचारतो—

—काय बरं समजावा या चिरुटाचा अर्थ ?

चर्चिलसाहेबांना इतकं चिरुटाचं वेड कां ?

इंग्लडचा हा कर्तबगार मुख्य प्रधान लोकांना निरनिराळ्या कारणांसाठीं आवडतो. कुणाला त्याच्या रगेलपणाचं व उन्मत्तपणाचं कौतुक वाटतं,—जर्मनीच्या हुकूमशहाइतकाच बेफिकीर गुर्मीनं बोलणारा बहाद्दर इंग्लडला मुख्य प्रधान लाभला म्हणून कुणी धन्यवाद गातात! कुणी त्याच्या पल्लेदार वक्तृत्वावर खूप असतात–स्वारी रंगांत येऊन वक्तृत्वाचा झंझावात सुरूं झाला कीं जणूं जगाचं यंत्र गदगदल्यासारखं वाटावं! कुणी त्याच्या लेखणीच्या विलासावर बेहद्द खूप आहेत!–त्यांचं **रोविंग कमिशन** हें आत्मचरित्र म्हणजे नुसत्या विद्युल्लतेच्या दांडगाईनं भरल्यासारखं वाटतं–इतकी लेखणी विलक्षण चपल व तेजानं रसरसलेली! जणूं तळपता खंजीरच शाईत बुडवून वापरल्यासारखं वाटावं! कुणाला त्याचा गोरा-गोबरा चेहरा आवडतो! गुबगुबीत देहाची ही स्वारी कोण ऐटदार पद्धतीनं डुलत डुलत जाते म्हणतां! अगदीं 'नमवी पहा भूमि ही चालतांना' या वाक्याची आठवण व्हावी!

मी त्यांना चाहतों तें मात्र निराळ्याच कारणासाठीं! मला चर्चिलसाहेबांचं कौतुक वाटतं तें या गोष्टींसाठीं नव्हे, तर या सर्व गोष्टी सूचित करणाऱ्या त्यांच्या मुखांतील जळत्या चिरुटाबद्दल!

केव्हांही पाहा! त्यांच्या मुखाचा व चिरुटाचा वियोग झाल्याचं सहसा दिसावयाचं नाहीं. त्यांच्या या चिरूट-प्रियतेचं मला मोठं कौतुक आहे. म्हणूनच माझ्या फोटो-आल्बममध्यें अनेक नामांकित व्यक्तींचे, कर्तबगार देशभक्तांचे, थोर संशोधकांचे, विख्यात कलावंतांचे फोटो असतांनाही तोंडांत चिरूट फडकवीत डोळ्यांत मिस्किलपणाचं हास्य झळकत असलेला चर्चिलसाहेबांचा भिंतीला रुबाबशीरपणं टेकून उभा राहिलेल्या पविऱ्यांतला फोटो एका सुबक सुंदर नक्षीच्या फ्रेममध्यें घालून मीं माझ्या लेखनाच्या टेबलावर ठेविला आहे.

त्या फोटोंत—किंवा त्या फोटोंतल्या चिरुटांत म्हणा पाहिजे तर!—चर्चिल-साहेबांचं सर्व वैशिष्ट्य प्रगट झाल्यासारखं वाटतं. तोंडांतला तो चिरूट इतरांप्रमाणं बेंगरूळपणं धरलेला नाहीं. काहीं माणसं सिगरेट ओढतांना ती अशा अजागळ पद्धतीनं धरतात कीं, ते सिगरेट ओढताहेत असं न वाटतां जणूं सिगरेटच त्यांना ओढते आहे असं वाटावं! काहीं विद्वानांचे पिकु-टलेले चेहरे पाहिले म्हणजे त्यांनीं ज्ञान पचविण्यापेक्षां निरनिराळ्या ग्रंथांनींच त्यांच्या मुद्रा कुरतडल्या आहेत असं नाहीं वाटत? त्यांतलाच प्रकार!

पण चर्चिलसाहेबांची चिरूट धरण्याची पद्धत पाहा!— वृत्तींतला उर्मट धीमेपणा त्या मिजासखोर लकबींत तुम्हांला उतरलेला दिसेल! आत्मविश्वास व सामर्थ्याची जाणीव त्यांतून डोकावतांना दिसेल. कसलंहि संकट कोसळलं तरी भंग न पावणारा करारी व निश्चयी शांतपणा त्यांत चमकतांना सांपडेल. मला वाटतं, चार्चिलसाहेबांची मुख्य प्रधानपदासाठीं जी निवड झाली ती त्यांची चिरुटाची पद्धत पाहून! कोणत्या परिस्थितींत ते प्रधानपदीं आले त्याचा क्षणभर विचार करा! जर्मन बॉंबफेकीनं लंडन शहराची दैना उडवलेली; जर्मन माऱ्यापुढं ब्रिटिश फौजांची दाणादाण उडालेली; फ्रान्ससारखीं मोठमोठालीं राष्ट्रं शत्रूंच्या घशांत पडण्याची स्पष्ट चिन्हं दिसत होतीं! अशा वेळीं मंत्रिमंडळापासून ते फेरीवाल्यापर्यंत सर्वांची त्रेधा उडालेली! दिवसा–रात्रीं विश्रांति नाहीं! मुसळधार पावसाप्रमाणं बॉंबची वृष्टि संतत चालू. पण राष्ट्रावर संकटपरंपरा कोसळली असतांनाही जणूं कांहीं घडलंच नाहीं अशा बेफिकीर जाणीवेनं तोंडांत ऐटीनं चिरूट मिरवीत डुलत डुलत, मनमोकळेपणानं हंसत जातांना जेव्हां या स्वारीला इंग्रज जनतेनं पाहिलं, त्यावेळीं प्रथम ते विस्मयचकित झाले व विस्मयाची लाट ओसरतांच चार्चिलसाहेबांचा धीमेपणा

पाहून त्यांची भेदरलेली मनं ताळ्यावर आलीं; निराश मनांत आशेचा अंकुर फुटला व सर्वांनीं एकदम ओरड केली—

'बस्स्! आम्हांला असला चिरूटवालाच प्रधान पाहिजे. वरून बॉंब पडत असतांनाही जो चिरुटाला विसरत नाहीं तोच आम्हांला पाहिजे. त्याचा चिरूट पाहिला कीं आम्हांला धीर येतो! बस्स! बस्स! चर्चिल-चर्चिल!—चिरूटवाला चर्चिल द्या आम्हांला!'

जनतेनं असा हलकल्लोळ सुरू केलेला पाहून चर्चिलसाहेबांनींही एक नवीन चिरूट सफाईदारपणं पेटविला व हंसत हंसत नव्या जागेवर येऊन ते रुजूं झाले. जणूं त्यांचं तें मिस्किल हास्य सांगत होतं—

'अरे असे डरतां काय! इतकं भ्यायला झालंय काय! पडूं द्या किती बॉंब पडतील ते—त्यांतल्या अग्नीनं मी माझा चिरूट पेटवीन, अन् या चिरुटाप्रमाणं जर्मन-इटलीला दातांत धरून हां हां म्हणतां फुंकून टाकतों—काय समजलां?'

चर्चिलसाहेबांचा चिरूट असा बहुगुणी असल्यामुळं मला नेहमींच त्याचं कौतुक वाटतं व मनांत आनंद भरला म्हणजे फोटोंतल्या चिरुटाबरोबर मूक गप्पा मारण्यांत मला मौज वाटते. कधीं कधीं वाटतं, या चिरुटानं या माणसाची प्रकृति कशी बिघडली नाहीं? तंबाखूनं शरिरांतलं रक्त विषारी बनतं, छाती जर्जर होते, मुद्रा निस्तेज होते, मनांतला उत्साह मंदावतो, वृत्ति संतापी बनते, श्वासोच्छ्वास दूषित होतो, दांत खराब होतात असं कुठं तरी वाचल्याचं आठवतं! जेव्हां जेव्हां तंबाखूचे दुष्परिणाम मी ऐकतों त्यावेळीं मी चर्चिलसाहेबांच्या धिप्पाड देहाकडे बघतों व सिगरेट सोडण्याबद्दल जर कधीं मनांत विचार आला तर तो जणूं फोटोंतली त्यांची

तेजस्वी मुद्रा पाहून घाबरून पळ काढतो. त्यांतून परवांच एका अमेरिकन डॉक्टरानं तंबाखूंत ‘बी व्हिटॅमिन्’ असतं असा शोध लाविल्याचं माझ्या वाचनांत आलं. तेव्हांपासून ज्या द्रव्यानं विन्स्टन् चर्चिल यांचा चिरेबंदी देह सांभाळला त्याचा अविचारानं त्याग करायचा नाहीं असं मीं निश्चयानं ठरविलं आहे. तंबाखूविरुद्ध ओरड करणारीं माणसं सामान्यतः आंबट द्राक्षाबद्दल ओरडणाऱ्या कोल्ह्याच्या जातीचीं असावीं असं वाटूं लागतं. या असंतुष्ट लोकांच्या कांगाव्यामुळंच तंबाखूच्या थोरवीकडे जगाचं दुर्लक्ष झालेलं आहे.

—एकच उदाहरण देतों. तंबाखूचा वाङ्मयनिर्मितीवर किती तरी फायदेशीर परिणाम झालेला आहे! पण कुणीं त्याबद्दल तंबाखूचे आभार मानले आहेत? वॉल्टर रॅलेनं तंबाखू आणून इंग्लंडवर इतके महान् उपकार केले पण कुणाला त्याची दखल नाहीं; पण तेंच भटक्या कोलंबसाचं कोण कौतुक! माझ्या पुस्तकालयांतलीं पुस्तकं जेव्हां मी फावल्या वेळांत न्याहाळीत बसतों त्यावेळीं वाटतं, जर जगांत तंबाखू नसती, तर या समोरच्या कपाटांत जी नामांकित ग्रंथांची फौज उभी आहे ती अशी गर्दीनं उभी राहिली असती? निदान इंग्रजी वाङ्मयाबद्दल तरी मला वाटतं कीं, त्यांतले नामांकित ग्रंथ धूम्रतरंगांतून जन्म पावले आहेत. एकट्या कार्लाईलचीच गोष्ट घ्या. हा बलाढ्य लेखक तंबाखूचा किती शोकी होता हें रसज्ञांना सांगायला नको. तो स्वतः तर तंबाखू ओढीच; पण आपल्या परमपूज्य मातोश्रीलाही तिचा भरपूर सांठा पुरवी. त्याचं **फ्रेंच राज्यक्रान्ति** हें पुस्तक मी वाचूं लागलों—व विशेषतः ‘सप्टेंबरांतली कत्तल’ हें प्रकरण वाचायला घेतलं—कीं वाटतं पाना पानावर जे निखारे फुललेले वाटतात ते त्याच्या चिलमींतून तर बाहेर निघाले नसावे?

तंबाखूप्रमाणं मद्याची थोरवी अमान्य करण्याकडेच जगाचा कल दिसतो; पण तंबाखूप्रमाणंच मद्यानं वाङ्मयाची वेल फोंफावलेली दिसून येईल. इंग्रजी विनोद इंग्रजी साहित्याचं सर्वांत उज्ज्वल भूषण समजलं जातं. या विनोदाचा परिपोष मद्यानं किती केला आहे हें पाहायला केवळ सर टोबी, फॉलस्टाफ इत्यादींचीं नांवंच सांगायला नको. अनेक महाभागांनीं मद्यपान करून इंग्रजी ग्रंथकारांच्या प्रतिभा प्रज्वलित केलेल्या आहेत! जर शेक्सपियरच्या काळीं मद्यपाननिषेधाची चळवळ प्रभावी असती तर त्याचं वाङ्मय आहे त्यापेक्षां थोडंफार 'कोरडं' राहिलं असतं याबद्दल संशय नाहीं. मद्याचं महत्त्व ओळखूनच त्या कविश्रेष्ठानं 'Come, Come, good wine is a good familiar friend' असे शहाणपणाचे उद्गार कुठंतरी काढलेले आहेत. इंग्रजी वाङ्मयांत जीं अमर विनोदी स्वभावचित्रं दिसतात, त्यांच्या तोंडचा जर तुम्ही 'एकच प्याला' काढून घेतला तर त्यांची रसवंति खाडकन् थांबून त्यांच्या तोंडचा एक शब्दही तुम्हांला ऐकायला मिळणार नाहीं. एकच प्याल्याचा प्रश्न निघाला म्हणून विचारतों, गडकऱ्यांचा **एकच प्याला** वाचून व पाहूनही जर तुम्हांला मद्याचं महत्त्व कळलं नाहीं व त्याचा निषेध केला तर तळिरामापेक्षांही जास्त धुंदींत असतांना तुम्ही निषेधाची भाषा बोलत असता, असं समजलं तर चूक ठरेल ?

प्रथम म्हटलं त्याप्रमाणं मी आनंदांत असलों म्हणजे ज्याप्रमाणं सिगरेट शिलगवून हवेंतलीं धूम्रवलयं निरीक्षीत बसतों, त्याचप्रमाणं माझं मन उल्हासानं रसरसलेलं असलं म्हणजे एखाद्या उंची मद्याचा थेंब घेणं मला आवडतं ! कुणाला माझं हें म्हणणं चमत्कारिक वाटेल. दारूचा औषधासारखा उपयोग करणारीं माणसं मीं पाहिलीं आहेत. बेचैन मनाला शांतता पाहिजे असेल तर मद्य घ्यावं असं म्हणणारीं माणसं मला माहिती आहेत.

पण त्यांचं हें म्हणणं मला पटत नाहीं. औषधासाठीं मद्य घेणं मला नापसंत आहे. बेचैन मनाला शांत करण्यासाठीं या औषधाचा उपयोग करणं माझ्या मतं धोक्याचं आहे ! माणसानं एखादी गोष्ट औषधासाठीं म्हणून घ्यायला सुरवात केली कीं कालान्तरानं तिला एक विचित्र महत्त्व प्राप्त होतं. जरूरीची व म्हणून अपरिहार्य अशी वस्तु होऊन बसते ती. कंटाळा आला, चैन पडत नाहीं मनाला अशा परिस्थितींत मनुष्य मद्याकडे वळला तर त्याचे परिणाम फारसे वाईट होतील असं वाटत नाहीं ! कारण कसलं तरी ' सुख ' व्हावं यासाठीं जो मनुष्य मद्याश्रय करतो तो कांहींतरी अपूर्व, असामान्य गोष्ट मिळविण्याचा प्रयत्न करीत असतो—म्हणजे जी गोष्ट नेहमीं मिळणारी नाहीं ती मिळविण्यासाठीं तो मद्यपान करीत असतो ! उलट औषधासाठीं म्हणजे आरोग्यासाठीं मद्यपान करणाऱ्या लोकांची स्थिति लक्षांत घ्या ! आरोग्य ही चीज अशी आहे कीं, ती जर आपणाला मुकली तर आपली वेड्या-सारखी स्थिति होऊन जाईल; म्हणजे आपणांला सतत आरोग्य हें मिळालंच पाहिजे. यावरून आरोग्यासाठीं मद्य पिणं—म्हणजे तें एकसारखं पिणं—कसं धोक्याचं आहे त्याची कल्पना येईल. म्हणूनच आपली प्रकृति उत्तम असली, मन अत्यानंदांत असलं म्हणजेच मद्यपान करावं असं मला वाटतं—निदान माझी तरी तशी पद्धत आहे ! आनंदांत असतांना दारूचा थेंब जे घेतात त्यांचा आनंद दारूवर अवलंबून नसतो. कारण ते आनंदी असतात म्हणूनच ते मद्यपान करतात. उलट जे आरोग्यासाठीं दारु घेतात त्यांचा सर्व उल्हास आनंद व उत्साह या आचमनावर अवलंबून असतो. म्हणूनच माझं म्हणणं कीं, जेव्हां तुमचा आनंद दारूवर अवलंबून असतो त्यावेळीं ती घेतां कामा नये ! एक आनंदोत्पादक औषध म्हणून तिची

योजना फारशी कौतुकास्पद व स्पृहणीय ठरणार नाहीं! म्हणूनच उमर खय्यामची **रुबायत** मला एरवी एक काव्यसौन्दर्याची खाण म्हणून आवडत असली तरी मला त्याच्या बुडाशीं लपलेलं तत्त्वज्ञान पसंत नाहीं. उमरच्या कवितेचं सौन्दर्य वर्णन करणं म्हणजे फुलांचा सुगंध व तारकांचं हंसणं यांचं विश्लेषण करण्याइतकंच अवघड काम आहे! त्याच्या उपमा म्हणजे लावण्याचे तुषार! पण त्याचं तत्त्वज्ञान? एका हातांत कवितांची चोपडी घेऊन वाचतांना त्यानं दुसऱ्या हातांत जो मद्याचा प्याला घेतला आहे तो कशासाठीं? तो अत्यंत आनंदांत आहे म्हणून? मनांत उल्हास मावत नाहीं म्हणून? नव्हे. तो मद्याचा प्याला नसून औषधाचा प्याला आहे! आरोग्यासाठीं त्यानं तो उचललेला आहे! जर त्यानं तो रिकामा केला नाहीं, तर तो बेचैन होऊन वेडा होईल, त्याला काहीं सुचणार नाहीं, त्याची पिसाटल्यासारखी स्थिति होईल! ज्या पेयाच्या अभावी माणसाची वेड्यासारखी स्थिति होते तें पेय घातकी समजावयास पाहिजे. म्हणूनच आनंदी वृत्ति असतांना मद्याचा थेंब घ्यावा अशी माझी शिफारस आहे!

मद्यपान व धूम्रपान याजबद्दल असं निःशंकपणें लिहितांना विसाव्या शतकांतल्या उदार विचारसरणीच्या संरक्षणाखालीं मी उभा आहें हें मी जाणून आहे! मद्यपानाची गोष्ट सोडूनच द्या–पण धूम्रपानाबद्दल निरनिराळ्या कालखंडांत जे विचित्र विकल्प प्रचलित होते त्याचा विचार केला तर अंगावर भीतीचे शहारे उभे राहतील! एकेकाळीं धूम्रपानाबद्दल देहान्तशासनाची शिक्षा असे, असं कुणीं म्हटलं तर ती दंतकथा वाटण्याचा सभव आहे! पण १६०३ सालीं तुर्कस्थानांत खरोखरच धूम्रपान करणारांचा अनन्वित छळ होत असे! अहमदचा मुलगा मुराद याच्याइतका दुष्ट पशु कोणत्याही देशाच्या गादीवर आला नसेल! चौदा वर्षांचा असतांना याचे

हातीं राज्य आलं व तेव्हांपासून धूम्रपान करणाराविरुद्ध त्यानं आपलं हत्याकांड सुरू केलं. हरून अल् रशीदप्रमाणं वेषान्तर करून हा रात्रींचा भटकत असे व जर कुणी तंबाखू ओढतांना दृष्टीस पडलं कीं, त्याचा तात्काळ शिरच्छेद करण्यांत येई. या दोन पायांच्या जनावरानं आपल्या कारकीर्दींतलीं शेवटलीं पांच वर्षे लोकांना फांसावर चढविण्यांत प्रामुख्यानं घालविलीं. तेवढ्या काळांत त्यानं पंचवीस हजार माणसं सुळावर चढविलीं. पैकीं पंधरा हजारांना केवळ धूम्रपानाबद्दल प्राणास मुकावं लागलं. आपल्या अन्तःपुरांतील अनेक स्त्रियांना त्यानं धूम्रपान केल्याबद्दल ठार केलं. यापेक्षां जरा कमी पण तसलीच रानटी शिक्षा रशियांत एके काळीं दिली जात असे. मायकेल फिओडोरोविश ( Michael Feordorovitch ) च्या अमलांत तंबाखू ओढणाऱ्या स्त्रियांना पंधरा फटक्यांची शिक्षा असे किंवा त्यांच्या तंबाखूच्या नळ्या त्यांच्या नाकांत कोंबून त्यांची भर रस्त्यांतून धिंड काढण्यांत येई ! एलिझाबेथ राणी वाटेल तें जहाल मद्य पचवीत असे, पण तंबाखूचं व तिचं वावडं असे. एकदां तिनं तो प्रयत्न करून पाहिला पण त्यामुळं तिला इतका त्रास झाला कीं, त्या त्रासाचं उट्टं भरून काढण्यासाठीं तिनं नॉटिंगहॅमची कौंटेस आणि तिच्या दाया यांच्या तोंडांत तंबाखूच्या नळ्या देऊन तब्बल तीन तास त्यांना धूम्रपान करायास लाविलं. व्हिक्टोरिया राणी जवळजवळ असलीच होती. तिचा प्रिय आल्बर्ट जरी सिगरेटचा मनस्वी शोकिन होता तरी तिला त्या व्यसनाची फार चीड असे; इतकी कीं, सातवे एडवर्ड हे प्रिन्स ऑफ वेल्स असतांना आपल्या आईच्या नकळत विंडसर राजवाड्याच्या धुराड्यांत जाऊन आपली तलफ भागवून घेत. आईच्या देखत सिगरेट ओढण्याची त्यांची प्राज्ञा नव्हती ! ग्लॅडस्टनसाहेबांना आपल्या मंत्रीमंडळांतील सभासदांनीं धूम्रपान केल्याचं कधीं

आवडत नसे. उलट बाल्डविनूसाहेबांना पाईप नसला तर चैन पडत नसे; तीच गोष्ट बर्कनहेडसाहेबांची ! एकेकाळीं तर म्हणे ईटन हायस्कुलांत जो मुलगा औपधी द्रव्य म्हणून दिलेली तंबाखू ओढण्याचं नाकारी त्याला जबर शिक्षा केली जात असे. जॉन् रॉजर्स नांवाच्या एका मुलाची अशी गोष्ट सांगतात कीं, या मुलानं सिगरेट ओढावयाचं नाकारतांच त्याला रक्तबंबाळ होईपर्यंत अधिकाऱ्यानीं चाबकानं फोडून काढलं. उलट जे लोक धूम्रपान करतील त्यांना नागवं उघडं करून चाबकाची शिक्षा पहिला जेम्स देत असे. एकदां त्यानं व्हाइटहॉल राजवाड्यांत तीन बड्या उमरावांना तंबाखू ओढतांना पाहिलं; दुसरे दिवशीं त्यांना कामावरून दूर करण्यांत आलं. 'असला विपारी धूर माझ्या राजवाड्यांत नको' असं तो कटाक्षानं म्हणे इतकेच नव्हे तर या विपयावर एक लेख लिहून त्यानं 'शरीर व मन यांना अपाय करणारं हें घाणेरडं व्यसन दृष्टीलाही कसं ओंगळ आहे' त्याचं वर्णन केलं होतं. त्याच्या या रागालाच बिचारा सर वॉल्टर रॅले शेवटीं बळी पडला ! राजद्रोहाबद्दल रॅले कैदेंत होता खरा, पण तो तंबाखूचा सर्वांत मोठा तरफदार म्हणून जेम्सचा त्याजवर अतिशय रोष असे ! त्याला फांशी देण्याची कल्पना त्याच्या मनांत वरचेवर येई ! शेवटीं बारा वर्षांच्या कारागृहवासानंतर त्या शूर शिपायाचा त्यानं वध केला. मात्र समाधानाची गोष्ट एवढीच कीं, त्याचा प्राण घेण्यापूर्वी त्याला आवडणारी तंबाखू त्याला ओढायला मिळावी अशी जेम्स राजानं व्यवस्था केली होती !

त्याच्या मुखांतून शेवटचा धूम्रतरंग निघतांच रॅलेला फांसावर चढविण्यांत आलं ! फांशीकडे जातांना रॅलेची मुद्रा कशी दिसत होती याचं वर्णन माझ्या कुठं वाचनांत आलेलं नाहीं; पण आवडता पाईप ओढावायला मिळाल्यानंतर अगदीं बिनतक्रार तो वीरमणी वधस्तंभाकडे चालत गेला

असला पाहिजे खास! त्याचा पाईप विझतो न विझतो तोच त्याचा जीवितदीपही मालविण्यांत आला!

—आणि तसंच पाहिलं तर मानवी जीवित तरी या विश्वांत वायुलहरीवर खेळणारा धूम्रतरंग नव्हे कां? मोहक चन्देरी वेष्टणांतून बाहेर काढलेली सिगरेट कशी नुकत्याच स्नान केलेल्या गौरकाय बालिकेप्रमाणं दिसते! काडी उजळून तिच्या ओठांना लाल रंग दिल्यानंतर हळूं हळूं धूम्रवलयं त्यांतून पसरून काहीं वेळानं ती राख होऊन पडते! सुंदर जीवनाचा क्रम असाच असावा असं मला नेहमीं वाटतं! निकामी जीवन ठेवणींतल्या सिगरेटप्रमाणंच कुबट व निरुपयोगी बनून जातं! शिलगाविलेल्या सिगरेटमधील धूम्रतरंगाप्रमाणं उपयुक्त जीवनांतील चैतन्याचा कण न् कण सदुपयोगांत विरला पाहिजे. ही चैतन्यज्योत उसळत्या तरंगाप्रमाणं वाऱ्यावर विरून जातां जातां वातावरण किंचित् काळ कां होईना प्रकाशमान् करून गेली ही कल्पना अन्तःकरणाला कमी संतोष देणारी नाहीं!

खरंच अगदीं धूम्रतरंगाप्रमाणं हें जीवन असायला पाहिजे! चर्चिलसाहेबांच्या तोंडचा तो पुष्टदेही चिरूट धूम्रतरंगांचे केवळ रिकामटेकडे खेळ खेळत नसून सत्कारणीं लागलेल्या जीवनाचं तें एक जळतं रूपक आहे असं नाहीं वाटत?

# थोर पुरुष २

दिवाळी–अंकाच्या बहराचे दिवस होते ते. वाङ्मयाचा ताटवा टवटवून फुलत असतो त्या वेळीं! या वेळेस संपादक मंडळींचा नम्रपणा विशेष प्रत्ययास येतो. अशाच एका विनम्र संपादकाकडून मला एकदा पत्र आलं. त्यांत स्वतःच्या साप्ताहिकाच्या दिवाळीअंकाचीं मनोरंजक सदरं कोणकोणतीं आहेत, कोणकोणत्या लेखकांचं लेखनसहाय्य मिळविलेलं आहे व तो अंक नटींचीं चित्रं व थोर लोकांचीं पत्रं यांमुळें कसा अपूर्व ठरणार आहे याचं रसभरित वर्णन केल्यानंतर त्यांनीं लिहिलं होतं—

"...तेव्हां या अंकासाठीं आपण एक लेख लिहावा अशी माझी विनंति आहे. मात्र यंदापासून आम्ही एक नवीन प्रथा पाडीत आहोंत. ती अशी कीं, निरनिराळ्या लेखकांना निरनिराळ्या विषयांवर लिहावयास सांगायचं. आपणासाठीं "आधुनिक काळांतील सर्वांत श्रेष्ठ पुरुष कोणता?" हा विषय आम्ही देत आहोंत. विषय किती आकर्षक आहे तें आपणाला

सांगायला नकोच. तरी या मथळ्यासाठीं एक लेख कृपा करून आमच्या-साठीं लिहावा. आपण नकार देणार नाहीं अशी खात्री आहे."

मला आवडलं तें पत्र. त्या पत्रासाठीं खास योजिलेली नम्र भाषा मोहक वाटावी अशीच होती. त्यांतून अप्रत्यक्षपणें वाहणारा प्रशंसेचा सूर कोण-त्याहि हट्टी लेखकाच्या मनाला सूक्ष्म गुदगुल्या करणारा होता! तेव्हां कौतुकानं मीं पत्र दोनदा वाचलं; त्यावर नीट विचार केला आणि शेवटीं उत्तर पाठविलं तें असं—

"आपण सुचविलेला विषय मनोरंजक व महत्त्वाचा आहे खास! वाचकांनाहि तो फार आवडेल; पण या विषयावर मला कांहीं लिहितां येणार नाहीं याबद्दल दिलगिरी वाटते. कारण काय लिहावं तेंच कळत नाहीं. धड चार ओळीहि लिहितां येतील कीं नाहीं याची शंका वाटते, तरी नकारा-बद्दल क्षमा करावी."

त्यावर त्यांचं तांतडीनं उत्तर आलं. त्यांत त्यांनीं माझ्या विद्वत्तेचं, वाचनाचं (या साप्ताहिकाला मी विनामोबदला लेख देत असे!!) अतिशयोक्त भाषेंत कौतुक केल्यानंतर शेवटीं म्हटलं होतं, "आपल्या-सारख्या माणसांनींच जर असं नकारात्मक लिहिलं तर आम्हीं काय करावं? तरी कृपा करून—"

पण या कृपायाचनेचा आज कांहीं उपयोग नव्हता. मी लगेच त्यांना उत्तर लिहिलं—

"आपण कृपेची याचना करतां; पण कृपा करतां येत नाहीं, कारण ती करतां येणंच शक्य नाहीं, ती करायला मी सर्वस्वी असमर्थ आहे."

यानंतर सुंदर सुंदर चित्रांनीं, मनोरंजक गोष्टींनीं बहरलेला तो अंक योग्य वेळीं प्रसिद्ध झाला आणि त्याची मोहक छपाओी व बड्या बड्या

लेखकांचीं त्यांत झळकलेलीं नांवं पाहून आपलं नांव त्यांत येण्याची संधि दवडल्याबद्दल मनाला विषाद वाटला.

मनांत विचार आला, " दिलं असतं एखाद्या प्रसिद्ध माणसाचं नांव ठोकून तर कुठं बिघडलं असतं ? असली भलतीच नम्रता काय कामाची ? आपण केलं तेंच बरोबर केलं. ज्या विषयाची आपणाला माहिती नाहीं त्या विषयासाठीं कां उगीच कागद नासायचे ?"

जगांतला सर्वांत थोर पुरुष कोण ?

प्रश्न बिकट खरा. पुष्कळांना या विषयाबद्दल थोडा फार अंदाज करता येईल, नाहीं असं नाहीं; पण या अंदाजापलीकडे जास्त जमेल असं वाटत नाहीं. खात्रीपूर्वक या विषयावर लिहिणं तर शहाणपणाचं ठरणार नाहीं. जगांतल्या थोर माणसांची यथार्थ किंमत तर राहोच पण साधं अस्तित्वहि लोकांना जाणवत नाहीं. तो थोर पुरुष संकटांशीं, दुःखांशीं आणि निराशांशीं झगडतां झगडतां शेवटीं मृत्यूला अधीरपणं कवटाळतो, वर्षानुवर्षं त्याची दखलहि कुणाला नसते आणि मग शतक अर्धशतक लोटल्यानंतर हळूहळू अंधारांतून प्रकाशकिरणं फांकावीं त्याप्रमाणं त्याच्या थोरवीची जाणीव होऊं लागते. भवभूतीसारखा खंबीर प्रतिभेचा कवीश्वर ! पण त्यालाहि भावी पिढ्यांच्या रसिकतेवर भिस्त ठेवून दिवस कंठावे लागले व 'निरवधि काल' व 'विपुल पृथ्वी' यांच्याकडून न्याय मिळण्याच्या कल्पनेवर विसंबावं लागलं. कीटस् कवीच्या शब्दमाधुर्याचं व सोज्वळ काव्यरचनेचं कोण कौतुक हल्लीं चाललेलं असतं ! पण या बालकवीचा मृत्यु त्याच्या कवितांवर कुणीं टीकाकारानं निर्दय प्रहार केल्याबद्दल धक्का बसून लवकर ओढवला हें प्रसिद्ध आहेच. आतां त्यामुळं ॲडॉनिससारखं रमणीय काव्य शेलेच्या प्रतिभेंतून रसिकांना मिळालं ती

गोष्ट वेगळी ! आज मराठी कवितेचे युगप्रवर्तक म्हणून ज्यांचा गौरव केला जातो ते केशवसुत जेव्हां १९०५ मध्यें प्लेगला बळी पडले त्यावेळीं त्यांच्या मृत्यूची वार्तादेखील त्या वेळीं वर्तमानपत्रांत आली नव्हती. गडकऱ्यांना दारिद्र्याइतकी दुसरी कुणाचीच संगत शेवटपर्यंत अशी लाभली नाहीं. ज्या काव्यामुळं मिल्टन जगतांत अजरामर झाला तें उतरून घ्यायलादेखील त्याच्या मुली तयार नसत आणि या आंधळ्या कवीला कोणी उतरून घेणारा भेटेपर्यंत आपल्या उसळत्या प्रतिभेला थोपवून धरावं लागलं. डॉ. जॉन्सनची जवळजवळ सर्व हयात अंधेरी माळ्यावर धावत्या उंदरांच्या व लठ्ठ घुशींच्या सहवासांत गेली. 'गुजगोष्टी लेखकांचा सम्राट' म्हणून ज्याला हल्लीं गौरविलं जातं त्या चार्लस् लँबला उभ्या हयातींत कधीं सुखाचे चार क्षण लाभले नाहींत. आपल्या थोरपणाची किंमत म्हणून कीं काय, सॉक्रे-टिसाला विष घ्यावं लागलं आणि ख्रिस्ताला सुळावर लोंबकळावं लागलं.

जगानं थोर लोकांविषयीं असा जणूं विचित्र हेवादावा धरलेला दिसतो. ज्या ज्या कालखंडांतील देशबांधवांनीं त्या त्या वेळच्या थोर व्यक्तींचा योग्य तो गौरव केलेला आहे, असा एकहि कालखंड, मला वाटतं, खात्रीलायकपणें दाखवितां येणार नाहीं. थोरपणाचे रंगच असे अस्पष्ट व नाजुक असले पाहिजेत कीं, त्यांची तात्काळ ओळख पटूं नये; नाहीं तर जगाची नजर अशी आंधळी राहिली नसती. झगझगीत प्रकाशाकडे साहजिकच माणसाचं लक्ष जातं; पण शांत व सौम्य प्रकाशाची जाणीव तितकी ठळकपणें होत नाहीं.

"पिकतं तेथें विकत नाहीं" हें वचन किती सत्य आहे तें जगांतील निर-निराळ्या थोर व्यक्तींची जी उपेक्षा त्यांच्या देशबांधवांनीं केलेली आहे त्यावरून कळून येईल. सन १६६० म्हणजे इंग्लंडच्या इतिहासांत कोण मांगल्याचा आणि अपूर्व भाग्याचा दिवस ! त्या दिवशीं इंग्लंडचे राजेसाहेब

दुसरे चार्लस् यांचं स्वदेशीं थाटांत आगमन झालं. लोकांना जणूं ती आनंदाची वार्ता कळतांच हर्षाचा उन्माद चढला. " आतां क्रॉमवेलची सैतानी राज्यपद्धति गेली; प्यूरिटनांचं प्राबल्य संपलं. आता चंगळच चंगळ! आतां नाटकं पाहण्यास मज्जाव नाहीं, चैनीचा दरवाजा खुला. आतां सुखाचा स्वर्ग हातीं आला... " अशा तऱ्हेनं लोकांची ओरड सुरू झाली. पण या कल्लोळांत त्या वर्षाच्या उन्हाळ्यांत अंगांत हिंव भरल्यामुळं काकडणाऱ्या चवदा वर्षांच्या एका मुलाकडे कोणाचं लक्ष गेलं? संधिवातानं बिछान्यावर तळमळत पडून तारकांचा आणि ग्रहगोलांचा त्याचा विचार चालू असे! ज्यानं आपल्या अनैतिक वर्तनानं लंडनला वेश्यागृहाचं जणूं रूप आणलं त्या चार्लस् राजावर विद्वानांनीं मोठे मोठे ग्रंथ रचले आहेत; पण आधुनिक ग्रहगोलशास्त्राचा ज्याला निर्माता म्हणतां येईल आणि ज्याच्या संशोधनामुळं न्यूटनला आपले शोध लावतां आले त्या जॉन् फ्लॅमस्टीडचं नांव कितीजणांना माहीत आहे? ज्या थोर संशोधकानं ग्रहगोलशास्त्राचं सगळं रूप पालटून टाकलं त्याला निरनिराळ्या शारीरिक व्याधींशीं व देशबांधवांच्या गैरसमजाशीं झगडतां झगडतां दारिद्र्यांत मरावं लागलं!

आजची इंग्रज-जर्मनांची हवाई युद्धांतील प्रगति आपणांला थक्क करून सोडते. फ्रान्स, बेल्जम, हॉलंडसारखीं राष्ट्रं आठवड्या आठवड्यांत बॉंबचा वर्षाव करून बेचिराख करून टाकणाऱ्या जर्मन वैमानिकांबद्दल आपण कोण कुतूहलानं बोलत असतों! पण ज्यांच्या अविश्रांत परिश्रमांमुळं पहिलं विमान तयार झालं त्या मॉंत्‌गॉल्फिअे बंधूंची आठवण किती जणांना आहे? त्यांच्या अलौकिक शोधांबद्दल त्यांची स्मृति आपल्या मनांत कितपत ताजी असते? आजकाल समुद्रावरून धावणाऱ्या वेगवान् अजस्र जहाजांना पाहून आपणांला केवढं कौतुक वाटतं! मोठमोठ्या नद्यांचे पूल आपल्या

छातीवरून आगगाड्यांना धीमेपणानं जाऊं देतात व प्रचंड पर्वतांचं हृदय फोडून निर्वेधपणें आगगाडी चाललेली असते. पण या सर्व अचाट पराक्रमाची कल्पना ज्याच्या मेंदूतून निघाली त्या इझांबार्ड किंग्डम् ब्रनेलचं नांव तरी आपल्याला माहिती आहे? त्याच्या असामान्य कल्पनाशक्तीबद्दल आपण किती कृतज्ञता त्याला दाखविली आहे? मोठमोठीं भव्य व उंची हॉस्पिटलं बांधणाऱ्या धनिकाचीं नांवं वर्तमानपत्रांतून प्रामुख्यानं झळकत असतात; पण ज्या जेम्स यंग सिम्पसननं क्लोरोफार्मचा शोध लावल्यामुळं कसाईखान्यांचीं इस्पितळं झालीं त्यांची स्मृति ठळकपणें आपणाला असते? एकोणिसाव्या शतकांत जर्मनीचा कर्तबगार थोर पुरुष कोण असं विचारलं तर प्रिन्स बिस्मार्क असं बहुतेकजण खात्रीनं म्हणतील. कारण त्यानं जर्मन साम्राज्याचा पाया घातला नाहीं का? एका राजाला त्यानं बादशहा केलं ही काय सामान्य कामगिरी म्हणायची? पण त्यानं रक्तपात, खून, मारामाऱ्या, बंडखोरी चालविली असतांना त्याच वेळीं शांतपणें घरांत बसून संगीताचा अभ्यास करणाऱ्या एका संगीतज्ञाकडे कुणाचं लक्ष तरी गेलं होतं? ज्यानं सबंध संगीतशास्त्रांत अभूतपूर्व अशी क्रान्ति केली, ज्यानं नाट्यकलेंत संगीताचं सुवर्ण ओतून तिला अमर केली, ज्यानं आपल्या विशाल प्रतिभेनं जगाला चकित करून सोडलं, ज्यानं ऑपेराची परंपरागत कल्पना बदलून टाकून त्याचं एक नवं शास्त्र बनविलं त्या संगीतसम्राट रिचर्ड वॅग्नरला मात्र कर्जदाराचा डोळा चुकविण्यासाठीं घरदार सोडून पळावं लागलं व एक भ्रमिष्ट माणूस म्हणून देशबांधवांची निर्भत्सना सहन करावी लागली. ज्यानं आपल्या अभिनव विचारसरणीनं आधुनिक जगाचं राजकीय तत्त्वज्ञान बदलून टाकलं, ज्यानं साम्यवादाचा पुरस्कार करून जणूं न्यायाचं नवयुग निर्माण केलं त्या कार्ल मार्क्सची त्याचे

काळीं कोणीं किती पर्वा केली ? आपली बायको व सहा मुलं यांच्यासकट त्याला दोन खणांच्या अडगळींत राहावं लागलं, उपासमार काढावी लागली, दारिद्र्यामुळं दोन मुलांचा अकालीं मृत्यु डोळ्यानं पाहावा लागला, भाडं देतां येत नाहीं म्हणून जागेसाठीं वणवण हिंडावं लागलं व शेवटीं दारिद्र्या-मुळं त्रासलेल्या पत्नीचा विरोध सहन करावा लागला. आणि जर ज्यू वकिला-चा हा मुलगा आज जर्मनींत असता तर कुणीं सांगावं भररस्त्यांत त्याला जिवंत जाळलंहि असतं ! चौदाव्या लुईची प्रत्यक्ष सूर्याबरोबर तुलना केली जाते. Le Roi Soleil अशी पदवीहि इतिहासकारांनीं त्याला दिलेली आहे; त्यानं ठेवलेल्या अंगवस्त्रांचीं रसभरित वर्णनं इतिहासकारांनीं केलेलीं आहेत. ॲलेक्झांडर राजा म्हणजे कोण पराक्रमी ! ज्यानं पंजाबपर्यंत येऊन आपला राज्यविस्तार केला तो कांहीं साधा पुरुष नव्हे; त्याचा आवडता घोडा ब्युसिफेलस् तर इतिहासांत प्रसिद्ध आहेच. हा घोडा हिंदुस्थानांत मरण पावला तेव्हां बादशहानं ब्युसिफेलिया नांवाचं एक शहर त्याच्या नांवानं वसविलं. मस्तानीच्या नाजूक गळ्यांतून झिरपणारा तांबूल-रस जगप्रसिद्ध झालेला आहे. महात्मा गांधींची शेळी आज हिटलरइतकीच प्रसिद्धि कमावून बसलेली आहे. जॉर्ज वॉशिंग्टन्च्या कुऱ्हाडीची प्रतिस्पर्धीच ती ! एलिझाबेथ राणीचे साखर खाऊन काळे झालेले दांत, तिच्यासाठीं वॉल्टर रॅलेनं चिखलावर पसरलेला मखमली झगा, ( या कथेला ऐतिहासिक पुरावा नाहीं असं हल्लीं ऐकतों ! ) क्लिओपाट्रानं छातीला चिकटविलेलं सापाचं पिल्लूं, एडमंड बर्कनं पार्लमेंटांत भाषण करतांना खिशांतून एकदम काढून दाखविलेला तळपता खंजीर, इंग्लंडच्या राजेसाहेबांनीं हिंदु आचाऱ्याच्या हातून घेऊन खाल्लेली चपाती, वेद घडाघडा म्हणून दाखविणारा वेदशास्त्रसंपन्न रेडा व व्हिक्टोरिया राणीचं कुलुंगं कुत्रं—यांचं इतिहासांत कोण कौतुक ! जवळजवळ बहुतेकांना

त्यांची माहिती; पण त्याच लोकांना गुन्हेगारांची व बदमाषांची भेट घेऊन तुरुंगसुधारणा करणारी एलिझबेथ फ्राय, रक्ताभिसरणाचं तत्त्व हुडकून काढणारा विल्यम् हार्वे, रोगजंतूंची माहिती सांगणारा लुई पाश्चूर, विजेचा शोध लावणारा लुइगी गालवानी, रेडियमचा शोध लावणारे क्युरी पतिपत्नी, देवीची लस शोधून काढणारा एडवर्ड जेनेर, जुलुमासाठीं चिरडल्या जाणाऱ्या देशांत नवचैतन्य निर्माण करून त्यांना स्वातंत्र्य मिळवून देणारी शेतकऱ्याची अडाणी मुलगी 'जीन् द आर्क' व नाजुक नक्षीच्या खोदकामाची कला निर्माण करणारा आल्ब्रेक्ट ड्यूरेर यांची माहिती अगर स्मृति कितपत असेल?

म्हणूनच जगांतील सर्वांत मोठा माणूस कोण याबद्दल निश्चित मत द्यायला माझी लेखणी धजत नाहीं. कुणीं सांगावं कोण असेल तो? रानटी टोळयांच्या संगतींत फिरून फिरून शेवटीं मरतां मरतां आपल्या विचारांनीं सुशिक्षित जगाची मनोवृत्ति बदलणारा तो एखादा थोर तत्त्वज्ञ असेल; खाणंपिणं, सुखसोयी यांची पर्वा न करतां आपल्या डोळयांच्या खाचा करून घेतलेला आणि आपल्या अपूर्व शोधानं सर्व जगाचं यंत्र गदगदून हालविणारा तो एखादा लंगडा, कुबडा शास्त्रज्ञहि असेल. आपल्या तत्त्वांचं प्रतिपादन करीत असतांना एखाद्या अडाण्याच्या कोयत्यानं माळावर मरून पडलेला एखादा थोर द्रष्टाहि तो असेल. जगताचं विचित्र कोडं सोडविण्यांत दंग झालेला, बायकामुलांनीं झिडकारलेला एखादा अस्थिरपंजर तत्त्वज्ञानीहि तो असूं शकेल. शारीरिक व्यंगाबद्दल जनतेच्या उपहासास पात्र झालेला, पण मानवी जीवनाला सौन्दर्याची झिलई देण्यासाठीं कलेचीं निरपेक्षपणें सेवा करणारा भोळाभाबडा कलावंतही तो असेल. आणि कुणीं सांगावं, आजच्या दंगलींत जर्मनीचा हुकूमशहा आपल्या धम-

कावण्यांनीं व राक्षसी लष्करी सामर्थ्यानं जगाचे डोळे दिपवीत असताना इटलीचा अनभिषिक्त बादशहा ठणठणीतपणें मन मानेल तें करीत असतांना, हरघडीं फ्रान्स-इंग्लंडमधील गडगडलेलीं व गडगडणारीं प्रधानमंडळें आरडा-ओरड करून जगाचं लक्ष आपणांकडे ओढून घेण्याचा प्रयत्न करीत असतांना कुठेंतरी एखाद्या बॉंबनं अर्धवट मोडलेल्या झोपडींत थंडीनं कुडकुडत, धड खायला अन्न नाहीं व नेसायला वस्त्र नाहीं अशा विचित्र परिस्थितींत शांतपणें एखादी व्यक्ति आपल्या नूतन व स्फोटक विचारसरणीचा बॉम्ब तयार करीत असेल, कीं ज्याचा स्फोट होतांच आजचं रानटी व पाशवी कल्पनांचं जंगल पेट घेईल, रक्तपात, जाळपोळ, खून, दरवडे यांच्या पायांवर उभा असलेला वीरश्रीचा व थोरपणाचा इमला कोसळून खालीं पडेल व या जळत्या जगांतून अभिनव सुंदर व पवित्र कल्पनांचं जग निर्माण होईल !

—पण एक गोष्ट मात्र मी निश्चितपणें सांगूं शकेन व ती म्हणजे तो थोर पुरुष कोणत्या जातीचा, कोणत्या तऱ्हेचा असूं शकणार नाहीं याबद्दलची. तो थोर पुरुष पांचपन्नास लढाया मारून रक्तपाताच्या जोरावर बडा ठरलेला क्रूर मुद्रेचा योद्धा खास नसणार. तसाच कारवायांनीं, कारस्थानांनीं आणि कुटिल नीतीनं रंगभूमीवर दांडगाई करणारा एखादा राजकारणी पुरुषहि तो असणार नाहीं. कारण खरी थोरवी आरडाओरडींतून व दांडगाईतून निर्माण होत नसते. तिचं स्वरूप शांत, सुमधुर व नम्र असं असतं. तिचं अस्तित्वहि कधीं कधीं हवेप्रमाणं जाणवत नाहीं.

एखाद्या प्रचंड तोफेंतून राक्षसी आवाजाचा गोळा फुटावा असा आवाज करीत करीत थोरपणा प्रगट होत नसतो. खऱ्या थोरवींतूनहि नादनिनाद निघत असतात; पण ते तोफेच्या आवाजाप्रमाणें क्षणभर धडधडाट करणारे

नसतात. त्यांच्या संगीतलहरी हळूहळू पण अचूकपणें वातावरणांत पसरत जातात व युगेंन् युगें उलटलीं तरी या संगीताची जादू जगताच्या मनावरची पकड सोडीत नाहीं.

संपादकमहाराज, आतां तुम्ही सांगा, जरी मी तुमच्याकडून लेखनाबद्दल मोबदला घेत नसल्यामुळं तुम्हांला माझ्या व्यासंगाबद्दल व चौरस वाचनाबद्दल आदर वाटत असला तरी तुमच्या 'दिवाळी' अंकाला मीं लेख लिहिला नाहीं हें मीं योग्यच केलं असं नाहीं कां तुम्हांला वाटत?

(किर्लोस्कर १९४०)

# पत्र-वाचन ३

पत्र-लेखनाच्या नाजुक व बिकट कलेबद्दल अनेकांनीं रसाळ वक्तृत्व केलेलं आहे ! या सुन्दर कलेची आजकाल फार उपेक्षा होत असते या-बद्दलही बऱ्याच लेखकांनीं तक्रारही केलेली माझ्या वाचनांत आलेली आहे ! ज्या जगांत असली रमणीय कला उपेक्षिली जाते त्या जगाला सुसंस्कृत व सुधारलेलं जग म्हणतां येणार नाहीं अशा तऱ्हेची सर्व आधुनिक संस्कृतीबद्दल रागीट रोष प्रगट करणारी जहाल भाषाही अनेक लेखकांनीं लिहिली आहे ! या सर्व लिखाणांत पत्रलेखनकलेबद्दल जी आत्मीयता व्यक्त केलेली आहे ती योग्यच आहे !

पत्र-लेखन ही एक नाजुक कला आहे हें कोण अमान्य करील ?

पण पत्र-लेखनाप्रमाणं पत्र-वाचन ही एक अवघड कला आहे ही गोष्ट कुणाच्या नीटशी ध्यानांत आलेली दिसत नाहीं.

एखाद्या कलावन्ताप्रमाणं नामांकित कलाकृति लिहिण्याचं सामर्थ्य

सर्वांच्याच लेखणींत नसतं; तथापि त्या कलाकृतीचा गौरव योग्य तऱ्हेनं करणं यांतही कलेचा कमी भाग असतो असं समजण्याचं कारण नाहीं. निर्दोष कलेचं मर्म समजण्यासाठीं रसिकाची मनोवृत्तिदेखील कला-युक्त असावी लागते. कालिदासाच्या कलाविलासाचं कौतुक वेंधळ्या अजागळ मनाला काय होय! शेक्सपियरची कलाचातुरी भावशून्य मनोवृत्तीला कशी कळावी? बालकवीच्या कोमल गीतांची जादू व्याकरणकोविदाला कळूं नये यांतच त्याच्या प्रतिभेचा गौरव झाला नाहीं कां? कला निर्माण करण्याइतकंच चातुर्य कलेचं रसग्रहण करतांनाही लागतं ही गोष्ट विसरून चालणार नाहीं!

पत्र-लेखन जर नाजुक व अवघड कला समजली तर पत्र-वाचन हीही एक बिकट कला आहे हें ओघानं आलंच! पण छापील मजकुरानं ग्रस्त झालेल्या आधुनिक युगांत या कलेची उत्तरोत्तर उपेक्षाच होणार कीं काय याबद्दल मला भीति वाटूं लागते. स्वस्त छपाईच्या हल्लींच्या काळांत लेखनाबद्दल वाटावयाची कौतुकबुद्धि हळुंहळूं ओसरत चालली आहे. हरघडीं इतका छापील मजकूर हात जोडून आपली वाट पाहत असतो कीं, आपल्या कृपेची याचना करणाऱ्या निष्कांचनाची आपण पर्वा करूं नये अशी बेपर्वाईची वृत्ति उत्तरोत्तर आपली होत चालली आहे आणि ती तशी व्हावी असाच छापखान्याचा उपद्रव झाला आहे! श्रीखंड हा उत्तम पदार्थ खरा! पण त्याची पिपेंच पिपें दाराजवळ येऊन पडलीं तर त्याचा तिटकारा यावा यांत नवल काय! ज्यावेळीं मुद्रणकलेचा शोध लागलेला नव्हता त्यावेळीं एखाद्या चिमुकल्या कवितेसाठींदेखील माणूस धडपडे! पण आज-काल शेंकडोंनीं काव्यग्रंथ प्रसिद्ध होत असतांना कवींचं पिशाच्च टाळण्याकडे जनतेची प्रवृत्ति व्हावी यांत अचंबा वाटण्याजोगं कांहीं नाहीं!

मुद्रणकलेनं सर्व वाङ्मय-कला संकटांत आणल्यामुळं लेखनाप्रमाणं वाचनांतही कला असते हें सांगण्याची वेळ आतां आली आहे. म्हणूनच मी मघाशीं म्हटलं त्याप्रमाणं—

पत्र-लेखनाप्रमाणं पत्र-वाचनदेखील एक महत्त्वाची व संपादनास योग्य अशी बिकट कला आहे ही गोष्ट विसरून चालणार नाहीं.

पत्र-वाचन ही एक चतुराईची कला आहे याचा अनुभव मला स्वतः-लाच एकदां आला व तेव्हांपासून या कलेची थोरवी ओळखून त्याबरहुकूम वागण्याची खबरदारी मी घेत असतों. पुण्यास असतांना अगदीं नाहीं तरी निदान पांचसहा तरी पत्नं मला निरनिराळया ठिकाणाहून येत असतात. हीं सर्वच पत्नं प्रशंसेचीं असतात असं नव्हे. कांहीं पत्नं उदयोन्मुख लेखकां-कडून येतात. त्यांत कसला तरी उपदेश ( माझं वय व ज्ञान माहीत नसल्यामुळं ) याचिलेला असतो. कुणी पुस्तक-परीक्षणाचा आग्रह करीत असतात. क्वचित् लेखासाठीं संपादकीय विनंति असते; एखादं व्याख्यानाचं आमंत्रणही असतं. गरीब विद्यार्थ्यांचीं मदतीसाठीं येणारीं पत्नं नित्याचीं झालीं आहेत. एखादा प्रकाशक नूतन ग्रंथाची मागणी करीत असतो; कधीं कधीं माझे ग्रंथ वाचून व मासिकांतील लघुकथा-गुजगोष्टी वाचून एखाद्या पत्रांत निर्मळ आनंद व्यक्त केलेला असतो, तर एखाद्यांत स्पष्ट टीका-लेखनाबद्दल शिव्यांचा भडिमार असतो !

सांगण्याचा मुद्दा असा कीं, याप्रमाणं दररोज कसलीं ना कसलीं तरी पत्रं येण्याचा सराव झाल्यामुळं या पत्रांना उघडून वाचावं अशी उत्कटता मनाला वाटत नाहीं. यांपैकीं कांहीं पत्रं पहिल्या दोन ओळी वाचतांच मिटण्याची काळजी मी घेतों. घरांत दररोज गवळयाप्रमाणं पोस्टमनही येत असल्यामुळं त्याचा तो खाकी पोषाख, बटोळया डोळयांवर चढविलेला

जाड जाड भिंगांचा चष्मा, पोटऱ्या उघड्या ठेवणारी तंग विचित्र विजार पाहून मन उत्सुकतेनं फुलत नाहीं. त्यानं "साऽऽब !" असं म्हणत पत्रं टेबलावर आणून टाकलीं कीं त्यावर झडप घालून अधीरपणें तीं उघडण्याचं मीं केव्हांच सोडून दिलं आहे.

पण सहा महिन्यापूर्वींची गोष्ट! न्यूमोनियानं बरेच दिवस आजारी असल्यामुळं मी अशक्त झालों होतों व हवापालटीनं आराम वाटेल या उद्देशानं मीं भोर संस्थानांतील माझ्या इस्टेटीच्या गांवीं जाऊन राहण्याचं ठरविलं. हें कोंडूर गांव मोटरच्या रस्त्यापापासून बरेंच दूर व आंत असल्या-मुळं प्रवासाचा मार्ग विशेष सुलभ नाहीं. माझी तिकडे बोळवण करतांना माझा पत्ता कुणाला लागूं नये याची घरांतल्या मंडळींनीं घेतलेली खबरदारी माझ्या लक्षांत मागाहून आली. पुण्यांतल्या पत्त्यावर मला येणारीं पत्रं मजकडे न पाठविण्याचा त्यांचा कट मला त्यावेळीं कळणं शक्य नव्हतं. ग्रंथ-वाचनाची ब्याद टाळण्यासाठीं मीं ट्रंकेंत घातलेलीं सगळीं बुकं पत्नीनं बेमालूम काढून घेतल्याचं फार उशीरा लक्षांत आलं. याचा परिणाम असा झाला कीं, मी कोंडूरगांवीं प्रकृति-स्वास्थ्यासाठीं गेलों तेव्हां मला वाचनासाठीं धड छापील चिटोरंही मिळेना!

माझी वेड्यासारखी स्थिति झाली! योग्य वेळीं मद्य मिळालं नाहीं तर दारुबाज बेचैन कां होतात त्याची मला कल्पना आली. होय, मद्याप्रमाणं वाचन हेंही एक चमत्कारिक व्यसन आहे. त्याची आवड जर योग्य वेळीं पुरविली गेली नाहीं तर मन बंडखोरपणा करूं लागतं. पिंजऱ्यांत पांखरानं तडफड करावी अशी मनोवृत्ति असंतुष्टपणानं आपले पंख फडफडवूं लागते. पण मद्यच मिळालं नाहीं तर दारुबाजाला हातपाय आपटीत स्वस्थ बसावं लागतं तशी माझी स्थिति झाली. शेवटीं जो वेळ एरवीं मी वाचनांत घाल-

विला असता तोही मी निसर्ग-शोभा पाहण्यांत घालवूं लागलों. सकाळीं उठतांच कोंवळ्या उन्हांत बसून रामफळीच्या झाडांतून आकाशांतून होणाऱ्या चैतन्य-वर्षावाला जी नाजुक मुरड मिळे ती निरखिण्याचा कार्यक्रम आरंभिला. कंटाळा आला कीं गोठ्यांत जाऊन गाईची मान खाजवून तिच्या नेत्रांत चमकणारी संतोषाची भावना पाहण्यांत वेळ घालवूं लागलों. मधेंच समोर विहिरीवर रहाटाचं चालू असलेलं संगीत श्रवण करावं, नाहीं तर कुणी चार शेतकरी जमले तर त्यांना चालू महायुद्धाची माहिती थोड-क्यांत व सोप्या शब्दांत सांगण्याचा क्रम ठेविला. कधीं कधीं शक्तीप्रमाणं हिंडण्यासाठीं बाहेर पडावं व बांधावरून फेरफटका मारावा. याप्रमाणं विविध तऱ्हेच्या कार्यक्रमांत वेळ जाऊं लागला तेव्हां शरीरापेक्षां मनाची झीजच झपाट्यानं भरून निघत असल्याचा अवर्णनीय आनंद मनाला होऊं लागला. जणूं सुप्त असलेली सौन्दर्य-दृष्टि जागृत झाली; कोळपून गेलेल्या रसिकतेला कोंवळे पल्लव फुटले, शुष्क झालेल्या भावना संजीवित झाल्याचा उल्हास-कारक अनुभव प्रतिक्षणीं येऊं लागला.

याप्रमाणं बहारीचा कार्यक्रम चालू असतांना मधून मधून मनाला सूक्ष्म विषादाची छटा चाटून जाई. गेला दीड महिना मला कुणाचं कोठून पत्रही आलं नव्हतं. वाटे, सगळेजण मला विसरले कीं काय ? कीं त्यांना माझा पत्ताच ठाऊक नाहीं ? कां या गांवाला पोस्टाची सोयच नाहीं ? याप्रमाणं मनांत विचार येत असतांना मी फिरावयास बाहेर पडलों व घरा-जवळचा माळ ओलांडून शेतीकडे वळणार तोंच घरचा गडी मागून धांवत आला व पोस्टमन घराजवळ माझी वाट पाहत असल्याचं त्यानं सांगितलं.

कोण विलक्षण आनंद झाला मला !

मी ताबडतोब मागें वळलों व झपाझप पावलं टाकीत घराकडे आलों.

दाराजवळ एक मळकट वेशांतला माणूस हातांत एक दोन पत्रं घेऊन उभा होता. शहरच्या पोस्टमनाप्रमाणं त्याला विशिष्ट तऱ्हेचा खाकी पोषाख नव्हता. त्यामुळं तो पोस्टमन आहे असं सांगतां येणं कठीण होतं. त्यानं माझ्या हातांत एक पत्र दिलं तेव्हां माझी उत्सुकता जणूं उतूं चालली होती. मीं त्याच्या हातून तें पत्र जवळजवळ ओढूनच घेतलं. माझ्या त्या घांदरटपणाबद्दल तो हंसलादेखील. पण पत्र उघडण्याबद्दल मी इतका उत्सुक झालों होतों कीं, मला त्याच्याकडे लक्ष देण्याला वेळ नव्हता!

त्या दिवशीं कितीतरी वेळां मी त्या पत्राचं पारायण केलं. एका सन्मित्राचं साधंच प्रकृतीबद्दलच्या चौकशीचं पत्र होतं तें! पण त्यांतलं वाक्य न् वाक्य मीं मनानं शोषून घेतलं. जो आज अनेक वर्षांत पत्रवाचनाचा आनंद मला लाभला नव्हता तो आज मिळाला! भुकेनं पोटांत कावूर उठलं असताना जोंधळ्याची ताजी भाकरी व लसणाची लाल चटणी मिळाली कीं जी अन्तःकरणाची तृप्ति होते तसली विलक्षण तृप्ति मला लाभली!

साध्या खुशालीच्या पत्राची ही गत! मग नामांकित कलाकारांचीं पत्रं जर अशा परिस्थितींत वाचावयाला मिळालीं तर पृथ्वीवर स्वर्गानंदाची प्राप्ति झाल्यासारखं वाटेल नाहीं? नव्हे असा हा स्वर्गीय आनंद मिळवणं प्रत्येकाच्या हातची गोष्ट आहे! बायरन्, कूपर, डोरॉथी ऑसूबोर्न यासारख्या नामांकित पत्रलेखकांची योग्यता समजून घ्यावयाची असेल तर आधाशीपणें व वाटेल तेव्हां या लेखकांचीं पत्रं उघडून वाचण्यांत अर्थ नाहीं. पति-पत्नींना एकमेकांचा सहवास दीर्घ काल लाभला व त्यांच्यांत विरहाचा प्रसंग कधींच आला नाहीं तर कालान्तरानं परस्परांबद्दलची आत्मीयतेची भावना हळुंहळुं मचूळ होऊं लागते. पण तेंच त्यांच्यांत

कांहीं काळ विरह होऊं द्या लगेच गंजत चाललेली प्रेमभावना भावनेच्या क्रान्तीनं तळपूं लागते. वाङ्मयाची गोष्ट अशीच असते. अनेक उत्तम लेखकांचे ग्रंथ भोंवतीं असले कीं त्याकडे ढुंकून पाहूं नये इतका वीट मनाला येतो. पत्रांचीही तीच गत. दररोज तुमच्या टेबलावर जर पत्रांचा ढीग पडूं लागला तर तुम्ही ती वाचण्यासाठीं एखाद्या कारकुनाची जरूर नेमणूक कराल !

पण तेंच दूर दूरच्या खेडेगांवीं पत्राविना तुमची कांहीं काळ उपास-मार होऊं द्या. प्रसंग येतांच साध्या चिटोऱ्यावरदेखील तुम्ही आधाशीपणानं झडप घालाल ! थोर पत्र-लेखकांची कला ज्यांना जाणावयाची असेल त्यांनीं जाणून बुजून अशी उपासमार करण्याची काळजी घेतली पाहिजे. मन असं भुकेनं तडफडलं असतांना या थोर कलावन्तांचे पत्रसंग्रह पेटींतून काढून वाचूं लागा !

कधीं अनुभवल्या नाहींत अशा स्वर्गीय आनंदाच्या निळसर लाटांवर तुमचा रसिकात्मा तरंगत राहिल्याशिवाय राहणार नाहीं !

पत्र-वाचनाचा आनंद ज्याला अनुभवावयाचा असेल त्यानं अशी खबरदारी घेऊन पत्रं वाचलीं पाहिजेत. या आनंदाला मार्केटांतल्या स्वस्ताईचं स्वरूप न येईल याबद्दल त्यानं डोळयांत तेल घालून जपलं पाहिजे. पत्रांचे संग्रह सभोंवतीं पडले असले तरी वाटेल तेव्हां ते उघडून न वाचण्याचा मनोनिग्रह त्यानं दाखविला पाहिजे. जर असा संयम शक्य नसेल तर चार दोन महिन्यांची रजा काढून दूर आडवाटेवरच्या खेडेगांवांत वस्ती केली पाहिजे. याठिकाणीं तुम्हांला जरूर नसलेलींच पत्रं येतील याची व्यवस्था तुम्हीं केली पाहिजे. जरूर नसलेलीं पत्रं म्हणजे जीं पत्रं केवळ अन्तःकरणपूर्वक लिहिलेलीं असल्यामुळं ज्यांत कसलीही भरीव

माहिती अगर बातमी नसते, तर ज्यांत पत्र-लेखकानं आपल्या अन्तर्यामांतील सौन्दर्य ओतलेलं असतं !

साधं खुशालीचं पत्र अशा एकान्त स्थळीं मिळालं तर कोण आनंद होतो !

—आणि जर अशा निवांत स्थळीं एखादं बिनजरूरीचं भावसौन्दर्यानं फुललेलं पत्र हातीं पडलं तर तें वाचीत असतांना अन्तःकरणांत पाझरणाऱ्या आल्हादाच्या सूक्ष्म धारा कोण वर्णन करूं शकेल ?

---

# जीवन-संगीत ४

तें दृश्य पहात किती तरी वेळ मी वेड्यासारखा उभा होतों. जणूं तें पाहतांच मला वर्तमानकाळाचा विसर पडला, मन कल्पनेच्या पंखावर बसून भूतकालांत कुठं तरी फिरत राहिलं व जणूं जादूनं मंत्रमुग्ध करावं असा मी उभा राहून तें गंमतीदार दृश्य पाहत राहिलों.

—त्याचं असं झालं.

शेतीचा खंड वसूल करण्यासाठीं म्हणून मी चार दिवसांची रजा काढून माझ्या गांवीं आलों होतों. खेडेगांवला जाण्याची कल्पना मनांत आली कीं माझं अन्तःकरण नेहमींच आल्हादानं फुलून जातं! अशा वेळीं जाणुनबुजून एकदोन जादा दिवस त्या शांत वातावरणांत घालविण्याची संधि मी सहसा दवडीत नाहीं. साहजिकच कांहीं निमित्तानं जाण्याची ती संधि येतांच मीं चटकन् रजा घेतली व खांद्यावर पडशी टाकून मी पायीं गावीं जाण्यासाठीं पहांटच्या सुमारास घरांतून बाहेर पडलों.

कांहीं लोकांना मोटरीनं प्रवास करण्याचं वेड असतं. रस्ता जितका वाहनानं तोडतां येईल तितका तोडण्याकडे त्यांचं लक्ष असतं. मला मात्र पायीं प्रवास करण्याइतकी आनंददायक गोष्ट दुसरी कोणती वाटत नाहीं. प्रवासांत निरनिराळ्या व्यक्तींशीं बोलायला मिळतं हें खरं. पण मला स्वतः मोटरबसमधून जातांना पेट्रोलच्या विचित्र वासानं भरलेल्या वातावरणांत अंगाला अंग खेटून बसलेल्या स्थितींत जाणाऱ्या प्रवासी लोकांबरोबर गप्पा मारायला बिलकूल आवडत नाहीं. पण तेंच पायीं प्रवास करीत असतांना रस्त्यानं कुणी भेटलं तर कसलं तरी निमित्त काढून त्याच्याबरोबर गप्पा मारण्याची संधि मी कधीं दवडत नाहीं. मोटरबसमध्यें मी तोंडाला कुलूप घातल्यासारखा गप्प असतों तर पायीं प्रवास करतांना कुणी भेटलं तर—

तेव्हां सांगायची गंमत अशी कीं, गांवाकडे मी असा पायीं निघालों असतांना हळुहळुं शहरची हद्द ओलांडली व जेव्हां खेडेगांवी वातावरण दिसूं लागलं तेव्हां कोणत्या तरी एका निराळ्याच प्रदेशांत, स्वच्छ व आल्हादकारक जगांत मी पाऊल टाकीत असल्याची विचित्र गूढ स्वरूपाची भावना मनाला स्पर्श करून गेली. चालतां चालतां सहज एका झाडाखालीं सिगरेट आडोशाला पेटवावी म्हणून थांबलों. खिशांतून सिगरेट काढली व काडी उजळून ती आतां सिगरेटला लावणार तोंच—

लहानपणींचा प्रेमळ संवगडी भेटावा त्याप्रमाणं कसला तरी पूर्वपरिचित असा आवाज कानीं पडला व काडी सिगरेटला लावण्याचं मी विसरून गेलों. तसं पाहिलं तर तो आवाज कांहीं कोमल अथवा मंजुळ नव्हता! जवळच काहीं अंतरावर लोहाराच्या झोंपडीशेजारीं त्याच्या हातून जो हातोडा ऐरणीवर पडे त्याचा राकट, कणखर आवाज होता तो! पण त्या कर्कश आवाजानंच माझ्या अंतःकरणाचे तंतू आकर्षून घेतले. तो आवाज

कानीं पडतांच मनांत गतस्मृतींचा कल्लोळ उसळला व क्षणभर मन त्याच स्मृतींचा सूक्ष्म पुनरानंद अनुभविण्यांत गर्क झालं.

कौतुक वाटून मी तेथून निघालों तो थेट त्या झोपडीजवळ आलों.

ओ हो ! कोण मजेदार दृश्य दृष्टीस पडलं माझ्या !

हनुमानाप्रमाणं पिळदार देहयष्टीचा व हंसतमुख असा एक तरुण लोहार तापलेल्या लोखंडावर घण मारीत होता व त्या लाल कांबीवर घण पडतांच त्यांतून चित्रविचित्र तऱ्हेचे सुवर्णरंगी अग्नि-स्फुलिंग एकदम आनंदानं उसळून हवेंत विरत होते. लाल लोखंडाची ती कांब त्याच्या तरुण पत्नीनं चिमट्यांत घट्ट धरली होती व हातोड्याचा घण पडतां पडतां तिच्या मुद्रेवर क्षणभर भेदरटपणाचा भाव येऊन लुप्त होई त्याची मोठी गंमत वाटे. घण पडतांच ते अग्नीचे सुवर्णकण गर्दीनं एकाएकीं उसळत त्याजकडे पाहून तो लोहार हंसे व त्याला हंसतांना पाहून त्याची पत्नीदेखील स्मित करी !

लोहाराचं तें हास्य व हातोड्याचा ऐरणीवर होणारा तो आवाज ऐकतांना माझ्या मनांत अनिर्वचनीय असे भावतरंग उठले. त्या मोहक दृश्यावर नजर खिळली व त्या आवाजानं अंतःकरणांत चोरटा प्रवेश करून तेथें गुप्तपणें लपून राहिलेल्या बालवयांतील स्मृतींची झोंपमोड केली व त्यांना खडबडून जागं केलं.

मला एका गोष्टीचं नवल वाटलं. गेल्याच आठवड्यांत कांहीं कामानिमित्त मी खडकीच्या दारुकामाच्या फॅक्टरींत गेलों असतांना तेथील धडपड, गोंधळ, गडबड पाहून व विचित्र तऱ्हेचे आवाज ऐकून माझं मन विटून गेलं होतं. लढाईसाठीं बूट शिवीत बसलेल्या चांभारापासून ते बॉम्बला उपयुक्त अशी स्फोटक द्रव्यं घेऊन मिश्रण करीत बसलेल्या तज्ज्ञ शास्त्रज्ञापर्यंत सर्वांची ती धडपड पाहून मला वाटलं, 'या लोकांना वेड तर नाहीं

लागलं? मनुष्यप्राण्याचा संहार व्हावा म्हणून कोण ही धडपड! जिवंत माणसांची मृत्यूसाठीं केवढी ही तयारी!!' फॅक्टरींतून मी बाहेर पडलों तेव्हां मनाला हायसं वाटलं व एका गुदमरविणाऱ्या गुहेंतून सहीसलामत बाहेर निसटल्याचा आनंद मनाला झाला! फॅक्टरींतील त्या आवाजानं मन आकर्षित होण्याऐवजीं तें विटून गेलं; त्या आवाजानं अंतःकरण बिलकूल हलूं शकलं नाहीं. उलट जर तो आवाज आणखी कांहीं वेळ कानीं पडला तर प्राण घाबरा होईल अशी भीति वाटत होती.

लोहाराच्या झोंपडींतलं तें चित्ताकर्षक दृश्य पाहिल्यानंतर मीं खिशांतून सिगरेट काढली; एक त्याला देऊन मीं दुसरी पेटविली व थोडा वेळ गप्पा मारल्यानंतर त्याचा हंसत हंसत निरोप घेतला व मी गांवचा रस्ता झपाझप तोडूं लागलों. मोटरचा रस्ता संपल्यानंतर पायवाटेनं मी चालूं लागलों तो कानांवर कसला तरी दूरवर वाऱ्यावरून वाहत आलेला सूक्ष्म घंटांचा आवाज आला! त्याबरोबर मन जणूं एकाएकीं जागं झालं व भूतकालांत त्याचं भ्रमण सुरू झालं. लहानपणीं शेतावर घालविलेलं कां कुणास ठाऊक आनंदी जीवन आठवलं. गव्हाच्या कोंवळ्या ओंब्या भाजून त्याचा हुरडा कसा खाल्ला त्याची आठवण झाली. हरबऱ्याचा कोंवळा पाला खातां खाता शेजारच्या शेतांत औत चालूं असतांना बैलांच्या गळ्यातल्या घंटांचा मृदु आवाज कसा अनुभवीत होतों ते दिवस—

आणि काय आश्चर्य! चालतां चालतां मनांत तो विचार येतो न येतो तोंच शेतांत चाललेलं एक औत दृष्टीस पडलं व मघाशीं कानावर जो आवाज पडला तो त्या बैलांच्या गळ्यांतील घंटांचा होता त्याची कल्पना आली.

खेडेगांवच्या वातावरणाची जादू ती हीच! या शान्त वातावरणांत जे नाद कानीं पडतात त्यांच्यांत पूर्वस्मृतींना जागृत करण्याचं विलक्षण सामर्थ्य

असतं. असलाच नाद तुम्ही शहरच्या धांदली वातावरणांत ऐका !–त्यामुळं तुमच्या अंतर्यामाला कसलीही मृदु भावना चाटून जाणार नाहीं. पुण्यांत रस्त्यानं जातांना हजारों बैलगाड्या दृष्टीस पडतात व बैलांच्या गळ्यांतले घुंगूरही वाजत असतात; पण भोंवतालीं माणसांचा गुणगुणाट, मोटर-टांग्यांचा कर्कश आक्रोश चालूं असतांना या नाद–ध्वनींचं •भावसामर्थ्यच जणूं एकाएकीं लुप्त होतं. ते ऐकतांना मन त्रासून जातं व 'नको तो त्रास' या भावनेनं माणूस चार पावलं दूर राहण्याचा प्रयत्न करतो.

खरी गोष्ट अशी आहे कीं, नादध्वनीची भावना-जागृतीची शक्ति पाहावयाची असेल तर खेडेगांवच्या शांत व सुमधुर वातावरणांतच जावयास पाहिजे. उदाहरणार्थ शहरांत कुत्र्याचं भुंकणं कानांवर आलं तर तो आवाज कर्कश व त्रासदायक वाटत नाहीं! पण तोच आवाज खेडेगांवांत डोंगरांतून नाहीं तर टेकडीवरून येऊं द्या !—कोण हृदयंगम वाटतो तो आवाज ! एका प्रेमळ सोबत्याची जणूं हांक वाटते ती ! याच हांकेनं शेतकऱ्याला संकटप्रसंगीं सामर्थ्य लाभतं—हीच हांक आपल्या मुलाबाळांचं संरक्षण करणाऱ्या एका इमानी रखवालदाराची आहे असं वाटून त्याचं अंतःकरण कृतज्ञतेनं भरतं ! जेव्हां निसर्गाशीं टक्कर देत देत माणसानं आपल्या संस्कृतीचं बीजारोपण केलं त्यावेळीं याच आवाजानं त्याच्या कोसळत्या धैर्याला सांवरून धरलं; याच प्रेमळ नादध्वनीच्या जोरावर अनेक साहसी मार्गांतून त्यानं बेगुमानपणं आपलं पाऊल पुढं टाकलं !

खेडेगांवीं विहिरीचा रहाट चालूं लागला म्हणजे मला तो कर्कश आवाज एखाद्या मंजुळ गीतासारखा वाटतो. मानवी निश्चयाचं, चिकाटीचं, सहन-शीलतेचं जणूं तें एक बोलकं प्रतीकच वाटतं मला ! जीवन-प्रीतीची थोरवीच जणूं तें लांकडी यंत्र उच्च स्वरानं बोलून दाखवीत असल्याचा

भास मनाला होतो ! पण याच लांकडी यंत्राला मुंबईस गिरगांवच्या नाक्यावर नेऊन ठेवा ! त्याचा चिरचिराट व घरघराट ट्रॅमच्या खरखराटापेक्षांही कर्कश वाटून लोक तेथून कानांवर हात ठेवीत ठेवीत चालते होतील !

शहरांत अकराच्या सुमारास शाळांच्या घंटा ठणठण वाजतांना ऐकून कुणाचं अंतःकरण पुलकित होतं ? तो आवाज ऐकतांच शिक्षकाच्या कपाळावर आठ्या चढतात, तर विद्यार्थ्यांना अभ्यासाच्या त्रासाची जाणीव होऊन त्यांचीं मनं रुष्ट होतात ! पण खेडेगांवांत देवळांतली घंटा कानीं पडतांच कोण कोमल भावनांचं नर्तन अंतःकरणांत सुरू होतं ! तो ध्वनि कानीं पडतांच बालवयांत पाटीपेन्सिल घेऊन घरांतून बाहेर पडण्यासाठीं केलेली धडपड आठवते !—तो घंटेचा आवाज नसून ज्ञानमंदिरांत सरस्वतीच्या वीणेवर चालू असलेल्या झंकारासारखा वाटतो तो ! सकाळच्या प्रहरीं तो आवाज कानीं पडतांच जगतानं धांदलीनं आपला आळस टाकून ज्ञानाची संगत जोडून आपली आंधळी दृष्टि टाकली !

मार्केटांत फिरतांना कोंबड्यांच्या हजारों पाट्या दृष्टीस पडतात ! अनेक कोंबड्या, त्यांचीं पिलं, कोंबडे यांची आरडाओरड कानीं पडते, पण त्यामुळं मन प्रफुल्लित होण्याऐवजीं जणूं रुष्ट होऊन आपल्या पाकळ्या तें मिटून घेतं !

—पण खेडेगांवांत पहांटच्या शांत वेळीं कोंबड्याचं आरवणं कानीं पडूं द्या ! तो ध्वनि कानीं येतांच अंतर्याम कसं वर्णनातीत भावनांनीं फुलून निघतं ! हाच ! हाच तो आवाज !!—तें आरवणं नसून आपल्या बालकांचं प्रबोधन व्हावं म्हणून सृष्टिमातेनं पवित्र स्वरांत गायिलेली ती भूपाळीच वाटते नाहीं ? उषःकालाचं आगमन सुचविणारी ती मंगल वाणी वाटते ! त्या आरवण्यांतील शांत गांभीर्य, त्यांतला जिवंतपणा,

त्यांतली खिन्नतेची झांक सर्वच कांहीं अन्तःकरण हळूंहळूं व्यापून टाकीत असल्याची भावना ऐकणाराला होत असते.

लोहाराच्या ऐरणीवरचं तें संगीत ऐकतांच माझं मन असं लुब्ध कां झालं त्याचा आतां उमज पडेल. हातोड्याचा घाव पडतांच वेदनेनं तडफडून ऐरणीनं काढलेला तो चीत्कार मानवानं जीवनावरील असीम प्रीतीसाठीं जी चिकाटी व सहनशीलता दाखविली तिचं जणूं गीतच गात होता! तो हातोडयाचा कर्कश आवाज नसून जीवनसंगीताचे ते पवित्र स्वर होते! असंख्य संकटांतून, विरोधी बिकट परिस्थितींतून प्रचंड झंझावातांना न जुमानतां मानवानं जी आपली जीवन-ज्योति अलौकिक परिश्रमांनीं तगविली तिचं संगीत ती ऐरण गात होती!

ऐरणीवर पडतां पडतां तो हातोडा गात होताः

'संकटांची आम्हांला पर्वा नाहीं! जगाच्या प्रारंभापासून मानवी जीवनाच्या घातासाठीं टपलेल्या हिंस्र श्वापदांशीं, विषारी जिवाणूंशीं, दुर्लंघ्य पर्वतारण्यांशीं झगडत मी आलों! मानवी आत्मा हा कोणत्याही बिकट परिस्थितीला बिचकणार नाहीं! संकटं आलीं असतांना त्याला स्फूर्ति येऊन तें **जीवन-संगीतच** गाणार!'

— आणि असामान्य पराक्रमांची शिकस्त करून जी जीवन-ज्योति मानवानं टिकविली ती एका क्षणांत फुंकरीनं विझविण्यासाठीं खडकीच्या फॅक्टरींतला तो भयप्रद आवाज चालू होता, म्हणूनच नाहीं कां विटलेल्या मनःस्थितींत मी त्या प्राणघातक आवाजाची ब्याद टाळण्यासाठीं तेथून तांतडीनं बाहेर पडलों?

# संजीवनी ५

माझ्या आल्बममध्यें जगांतल्या निरानिराळ्या नामांकित व कर्तबगार व्यक्तींचे फोटो आहेत. या आल्बममध्यें कायसर, मुसोलिनी, हिटलर, स्टॅलिन, रुझवेल्ट, गांधी, शॉ, चेंबर्लेन, रेनो यांचे फोटो आहेत. या निर-निराळ्या मुद्रांवरून नजर फिरविली म्हणजे मला एक मनोरंजक शंका वाटूं लागते. कायसर, मुसोलिनी, हिटलर यांच्या मुद्रा जणू सदा रागानं तळ-पलेल्या, कसला तरी हुकूम फर्मावीत बेफिकिरीनं पुरेपूर भरलेल्या अशा वाटतात. या व्यक्तींना हंसतां तरी येत नसावं ? नाहीं तर त्यांचे चेहरे असे उर्मट, बेफिकीर, गंभीर कसे ? उलट चेंबर्लेन, रुझवेल्ट, रेनो यांच्या मुद्रा सहास्य व मनमोकळ्या अशा वाटतात. हुकूमशाही व लोकशाही यांतील मूलभेद तर या मुद्रा दर्शवीत नसाव्या ? या तीन चार हुकूमशहांच्या मुद्रा पाहिल्या म्हणजे वाटतं कीं, जणूं सर्व जगाची जबाबदारी यांच्यावर पडली आहे ! नव्हे, त्यांच्या या हुकुमी मुद्रा पाहिल्या म्हणजे विचार येतो,

यांच्या देशांत लोकांना हंसतां येतं कीं नाहीं? विनोदाला वाव आहे कीं नाहीं? मनमोकळेपणाला महत्त्व आहे कीं नाहीं? खासगी बाबतींत हिटलरची वागणूक फार सालसपणाची व प्रेमळपणाची असते असं मीं कुठं तरी वाचल्याचं आठवतं; पण जर इतरांना असं वागतां येत नसेल, तर ही मोठी कौतुकाची गोष्ट आहे असं म्हणतां येणार नाहीं.

हुकूमशहांना हंसतां येतं कीं नाहीं असा प्रश्न विचारतांना मला केवळ गंमत म्हणून या विषयाची चर्चा करावयाची नाहीं. कारण क्षणभर असं समजा कीं, एखाद्या राज्यकर्त्याला विनोदाचं महत्त्व कळत नाहीं, मनमोकळेपणानं हंसतां येत नाहीं, सौम्यता व दिलदारपणा यांचं वावडं आहे; तर त्यांच्या अमलाखालीं राहणाऱ्या लोकांची स्थिति काय स्पृहणीय होईल? आजचे बिघडलेले राष्ट्राराष्ट्रांतले संबंध पाहिले म्हणजे कधीं कधीं एक सूचना करावीशी वाटते. समजा, जगांतल्या विनोदकुशल लेखकांची एक आंतरराष्ट्रीय परिषद भरविली व या लेखकांना हुकूमशहांच्या व लोकशाही राष्ट्रांच्या प्रधानांचे हक्क आणि सत्ता दिली तर काय परिणाम होईल? जगाचं नुकसान करणारे रक्तपात, गैरसमज, बंडें होतील कीं सर्वत्र शांतता, समाधान व संस्कृति यांचं खेळकर वातावरण दिसूं लागेल?

विनोदप्रिय माणूस नेहमीं धीमा व संथ स्वभावाचा असतो. त्याला फाजील भावनांचा सोस नसतो. तो बुद्धिप्रधान असतो. मानवी जीवनांत चालू असलेलं विकार–विचारांचं परस्पर विरुद्ध द्वंद्व तो नीटपणें जाणतो. माणसाची वृत्ति, आचार व ध्येय यांत नेहमीं दिसून येणारी मौजेची तफावत, नकळत स्वतःचीं व्यंगं प्रगट करण्यांत त्याचा दिसून येणारा वेंधळेपणा इत्यादि मानवी स्वभावविशेषांचं त्याला उत्कृष्ट ज्ञान असतं.

त्यामुळें या परिषदेचा प्रत्येक सदस्य मोठा बुद्धिवान्, चतुर, विचारशील व ज्ञानी माणूस असणार यांत संशय नाहीं. मग कोणकोणत्या व्यक्तींची या परिषदेसाठीं निवड करतां येईल? चेस्टर्टन दुर्दैवानं वारले, नाहीं तर इंग्लंडचा प्रतिनिधि म्हणून त्यांची निवड अगदीं नामांकित ठरली असती. त्यांच्याऐवजीं आल्डस् हक्स्ले आपण नेमूं; आयर्लंडकडून शॉसाहेबांना पाठवूं; कॅनडांतून स्टीफन लीकॉक येतील; अमेरिकेकडून रॉबर्ट बेंच्ले येतील; तसेंच रशिया, जर्मनी फ्रान्स, स्पेन यांचेही विनोदचतुर प्रतिनिधि निवडून एक नमुनेदार परिषद भरविली तर काय काय दृश्यं दिसतील? मला तर वाटतं कीं, एखाद्या महायुद्धाचे ढग आकाशांत जमून आतां अनर्थ कोसळणार अशा वेळीं जर विनोदपंडितांची परिषद घडवून आणली तर मोठी बहार होईल, नाहीं? जमलेले युद्धाचे ढग वाऱ्यांवर विरून जातील, काळवंडलेलं वातावरण निवळेल व कोंवळ्या सूर्यप्रकाशानं सर्व वातावरण खुलून जाईल. हे सर्व प्रतिनिधि एकमेकांविरुद्ध कारस्थान करून आपसांत गैरसमज पिकवून युद्धाचा सुरुंग उडवून देतील अशी कल्पना तरी मनात येते? मला वाटतं, त्यांच्याजवळ असलेली विनोदाची संजीवनी त्यांना असल्या कटु कारस्थानापासून परावृत्त करील. जेव्हां राष्ट्राराष्ट्रांतून युद्धाचा वणवा भडकतो त्या वेळीं युद्धाची आग पेटवणारे लोक जणूं अर्धवट वेडसर मनःस्थितींत असे असतात; त्यांचं गांभीर्य जणूं उतू जात असतं. धर्म, देव, राष्ट्रप्रेम, देशभक्ति असल्या फसव्या शब्दांचा कैफ त्यांच्या मनावर असतो. याच्या उलट या विनोद-पंडितांची वृत्ति पाहा. स्टीफन लीकॉक इतरांच्या कुरापती काढण्यापेक्षां आपल्या कॅनडाचे दुर्गुण वर्णूं लागतील, जर्मनीला टोंचून न बोलतां आयर्लंडच्या नांवानं शॉ खडे फोडूं लागतील, जर्मनीचा प्रतिनिधि इंग्लंडपेक्षां जर्मनीच्याच खुळचटपणावर प्रवचन करून सर्वांना

खदखदा हंसवील; इटलीचा प्रतिनिधि फ्रेंचांची चेष्टा न करतां स्वतःच्या राष्ट्रांतील गंमती सांगत सुटेल आणि शेवटीं सर्वजण उठून ठराव पास करतील कीं, प्रत्येक राष्ट्रांत बरीं वाईट लहान मोठीं व्यंगं भरलीं आहेत, तेव्हां कुणींच कुणावर हुकमत चालवूं नये; कुणीं बढाई मारूं नये व युद्ध पुकारण्याचा मूर्खपणा तर बिलकूल करूं नये.

कारण आजच चालूं असलेलं महायुद्ध जर नीट निरीक्षलं तर आपणांस काय दिसतं? महायुद्धाचा हा ज्वालामुखी कसा उद्भवला? फाजील महत्त्वाकांक्षी, कपटी, कारस्थानी, उर्मट व देशप्रेमाचं भूत अंगांत संचारलेले महान् देशभक्त यांनींच नाहीं कां ही काडी लावली? पण क्षणभर विचार केला तर असं दिसून येईल कीं, वर वर्णिलेल्या विनोदकुशल लेखकांइतकी बुद्धिमत्ता, चातुर्य, धैर्य आणि रसिकता या महत्त्वाकांक्षी व्यक्तींत दिसून येणार नाहीं. सामान्य व क्षुद्र गोष्टींचं चर्वितचर्वण करण्याची या मदांधांना संवय, तर आमचे विनोदपंडित उदारपणें जीविताला उपकारक अशा महत्त्वाच्या बाबींचाच विचार करतांना दिसतील. धूर्त राजकारणी माणसाची मुद्रा नेहमीं कावेबाजपणानं भरलेली, घाबरट, गोंधळलेली अशी दिसेल, तर प्रशांतता व संथपणा व मृदु हास्य हें नेहमीं विनोदप्रिय माणसांच्या ठिकाणीं सांपडेल. नव्हे, जरी असल्या विनोदकुशल लेखकांची परिषद भरविली नाहीं तरीसुद्धां निराळ्या तऱ्हेनं कोसळणारं युद्ध टाळतां येईल. स्टॅलिन्, हिटलर, मुसोलिनी, रेनो, चर्चिल इत्यादींची परिषद चालूं असतांना दररोज सभा भरण्यापूर्वी जर पांच दहा मिनिटं लॉरेल-हार्डी चित्रपटांतील निवडक प्रसंग त्यांना दाखविले तर मला वाटतं आकसलेलं वातावरण सुटेल; चिडखोरपणा वितळत जाईल व वीरश्रीचीं भाषणं व आवेश थांबून सगळं वातावरण निवळून जाईल!

कारण विनोदाची थोरवीच तशी आहे. आपल्या विचारांची मुरड बदलण्याची महान् जादू विनोदांत आहे. नव्हे, जगांत जर शांतता नांदावी अशी इच्छा असेल, तर विनोदाचं हें प्रभावी हत्यार गंजत ठेवून भागणार नाहीं. ज्या राष्ट्रांत बुद्धिप्रधान, विचारी आणि हंसतमुख लोक नाहींत, तें राष्ट्र कदापीही आदर्श म्हणतां येणार नाहीं. त्या राष्ट्रांत तोफांची गर्दी असेल, विमानांचे थवे असतील, टँक्स, विनाशिका, बॉंबस्, आरमार यांची रेलचेल असेल; पण लोकांना जर हंसण्याइतकी संस्कृति नसेल तर हें लष्करी वैभव फुकट आहे. जगांतील सर्व लोक बुद्धिप्रधान आणि सर्वांगपूर्ण होतील अशी आशा करणं वेडेपणाचं आहे; परंतु माझ्या मतें ज्या राष्ट्रांतील नागरिकांना आपापले गुणावगुण समजून ते सुधारून घेण्याची पात्रता आलेली आहे, तें राष्ट्र अधिक सुसंस्कृत, कार्यक्षम आणि सुविद्य समजावें. आचारविचारांचा साधेपणा, आनंदी मनोवृत्ति आणि कुशाग्र बुद्धि यांच्याशिवाय कुणीहि आदर्श नागरिक होऊं शकणार नाहीं. हे गुण विनोदचतुर माणसांत आढळून येतात.

आयुष्याची रंजकता वाढविण्यासाठीं विनोद हें किती उपकारक हत्यार आहे याची अजून पुष्कळांना नीटशी कल्पना नसावी. इतकंच नव्हे, तर मानवी संस्कृतीचे रंग बदलून आपल्या विचारांना व विकारांना सौम्यतेची झिलई देऊन एकंदर संस्कृतीचं स्वरूप अधिक उपयुक्त करण्याचं सामर्थ्य विनोदांत आहे असं म्हटलं तर बऱ्याच जणांना विस्मय वाटण्याचा संभव आहे. आपले अनुभव व भावना यांचा जीवित सुखमय करण्याकडे जर कुणी उपयोग करून घेईल तर तो विनोदच होय असं म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. इतकंच नव्हे, तर राष्ट्रीय घडामोडींनासुद्धां विनोदामुळं अनुकूल वळण मिळूं शकेल असं म्हणतां येईल.

म्हणून जेव्हां मी रात्रीं बिछान्यावर पडल्या पडल्या विचार करूं लागतों त्यावेळीं वाटतं जर राजकारणाला विनोदाचं इंजेक्शन दिलं तर त्याचं नासकं रक्त सुधारणार नाहीं? त्यावर कुणी तरी विस्मयानं म्हणेल—

'विनोद व राजकारण!—

—हा काय विनोद आहे बुवा!'

नव्हे, असा जर विस्मय कुणाला वाटला तर मला त्याचा विस्मय वाटणार नाहीं! कारण ज्या तऱ्हेनं जगाचं राजकारण चालूं आहे, जे तंटेबखेडे सुरू आहेत, एकमेकांवर नुसता बॉंब, विनाशिका, विमानं यांचाच वर्षाव चालू नसून लेखणींतूनही विषवर्षाव चालू आहे व अर्धं जग रक्तानं न्हालं आहे— अशा परिस्थितींत विनोदाला राजकारणाच्या संगतींत सोडण्याची माझी कल्पना भ्रमिष्टपणाची वाटावी यांत नवल काय! जर्मन पत्रांतून चालू असलेला इंग्रज-फ्रेंचांवर हल्ला; ब्रिटिश वर्तमानपत्रांतून जर्मनांना चालू असलेली शिवीगाळ, रशिया व इटली यांच्या पत्रांतून लोकशाहीची चालू असलेली कुचेष्टा व हिंदुस्थानांत हिंदु-मुसलमानांची एकमेकांवर चालू असलेली नमुनेदार पुष्पांजली यांचं दृश्य पाहून आणि यालाच राजकारण म्हणतात अशी कल्पना मनांत बिंबलेल्या माणसांना राजकारण व विनोद यांची सांगड हास्यास्पद न वाटली तरच नवल! संस्कृति व सुधारणा यांचं परमोच्च ध्येय म्हणजे मानवी जीवित सर्व दृष्ट्या सुखमय कसं होईल यासाठीं धडपड करणं! पण ही कसोटी लावून जर आपण विसाव्या शतकाचा विचार केला तर आपण एका विचित्र रानवटी युगांत आहोंत असंच म्हणावं लागेल. देशभक्ति व देशप्रेम यांच्या विचित्र कल्पनांचं थैमान चालू आहे, राष्ट्राराष्ट्रांतून गैरसमजाची आग पेटविण्याची अहमहमिका चालू आहे—

अशा वेळीं हें नासलेलं राजकारण पाहून मनांत विचार येतो, या रोगाला कांहीं उपाय नसेल काय? बिघडत चाललेलं राजकारण विनोदाच्या गोळीनं बरं होईल काय? केवळ कल्पनांशीं झुंज खेळत न बसतां जें खरंखुरं जीवन आहे त्याजवर नजर ठेवून विनोदचतुर व्यक्ति वावरतांना दिसते. म्हणूनच असं वाटतं कीं, जर भविष्यकाळीं महायुद्धाचा अनर्थ टाळावयाचा असेल तर देशभक्तीचं मद्य पिऊन तर्र झालेल्या हुकुमशहांच्या हातांत राज्यसूत्रं न ठेवतां तीं चतुर, हंसतमुख व आनंदी विद्वानांच्या हातीं ठेवावीं! कारण राजकारणाचं गढूळ पाणी निवळण्याचं सामर्थ्य विनोदांत खास आहे!

जर क्रेमलिन्, राइस्टाग, डिएट या ठिकाणीं गुप्त विचारांच्या विजा न चमकतां तेथलं वातावरण स्वच्छंद व निर्मळ हास्यानं दरवळत राहिलं—

तर आज थोरपणाचीं बिरुदं मिरविणारीं माणसं सुळावर चढतील; जे शूळ पूर्वी रक्तमय झाले त्यांना कोमल भावनांचं जल मिळून स्वातंत्र्याचे पल्लव फुटतील व आज शस्त्रप्रहारांनीं विद्रूप झालेली सृष्टीची मुद्रा पवित्र हास्यानं तळपतांना दिसेल!

—( मनोहर )

# हास्य ६

" मला जर पुन्हां जन्म घेण्याचा प्रसंग आला तर 'माझ्या मुद्रेवरील हास्य मोहक होईल अशी माझ्या चेहऱ्याची रचना कर !' अशी याचना मी परमेश्वराजवळ करीन " असं एका इंग्रज लेखकाचं—गार्डीनर तर नसेल तो ?—वाक्य वाचलेलं मला आठवतं. या एकाच वाक्यांत त्या लेखकानं हास्याची महति थोडक्यांत अप्रतिम रीतीनं वर्णिली आहे. या जीवितांतील यशापयश मुद्रेवर विलसणाऱ्या हास्याच्या रंगावर किती अवलंबून आहे याची त्या लेखकाला उत्कृष्ट कल्पना असावी.

या जगांत जीवितांतील यशाचं रहस्य कशांत आहे याबद्दल खात्री-लायक मत देणं सोपी गोष्ट नाहीं. जीविताचा हा पट इतक्या रहस्यमय धाग्यांनीं विणला गेलेला आहे कीं, दोन चार धागेदोरे उकलून दाखवून या पटाची संपूर्ण कल्पना देणं शक्य नाहीं. परिश्रमांच्या पाठबळावर संकटांना तोंड देऊन जगांत चमकलेल्या चार दोन थोरांचीं उदाहरणं स्फूर्तिदायक

तर खरींच; पण त्याचबरोबर परिश्रमांची परमावधि करूनही यश मिळण्या-पूर्वीच जीविताचा हा चिखल तुडवितां तुडवितां घेरी येऊन पडलेल्या लोकांचीं उदाहरणं काय थोडीं थोडकीं आहेत? पण माणसाची वृत्ति अपयशापेक्षां यशाकडेच जास्त ठळकपणें लक्ष देते.

" जीवनांत यश मिळावं अशी इच्छा असेल तर कोणते गुण संपादावे?" असं जर मला कोणीं विचारलं तर त्याला मी म्हणेन " बाबा, तसं पाहिलं तर कुणालाहि खात्रीलायक गुणांची यादी पुरवतां येणार नाहीं. मला विचारशील तर मी तुझ्या प्रश्नाचं उत्तर जरा निराळ्या तऱ्हेनं देईन! यशाच्या मार्गांत कसलाही अडथळा न आणतां प्रसंगीं त्याला उपकारक ठरेल असा कोणता गुण म्हणून विचारशील तर मात्र तो म्हणजे 'हास्य' असं मी कटाक्षानं म्हणेन. "

होय! हास्य ही चीज अशी आहे कीं, जरी त्याच्या जोरावर यशाचं फळ अचूक तोंडांत पडेल असं खात्रीनं म्हणतां येणार नाहीं, तरी यश-प्राप्तीच्या उपसाधनांत त्याचा निश्चित अंतर्भाव करता येईल! केवळ मुद्रे-वर हास्य चमकविलं कीं यशाचे दरवाजे खुले होतील ही कल्पना अरे-बियन नाईट्स्च्या 'ओपन सेसमे' इतकीच कल्पनारम्य आहे! हास्य म्हणजे कांहीं कल्पतरु नव्हे कीं, वांछिलेली वस्तु आपल्याकडे चालत यावी! कल्पतरु हादेखील कल्पनेतून जन्मला आहे! नाहीं तर आज जीवनयंत्रांत चिरडलं जाणारं जग सगळ्या धडपडी बंद ठेवून असल्या झाडाच्या तळाशीं वस्ती करून राहिलं असतं! हास्यामुळं यशप्राप्ती होईल ही कल्पना हंसण्यामुळं लठ्ठपणा वाढेल या कल्पनेइतकीच मौजेची आहे! नव्हे, " पोटभर हंसा व लठ्ठ व्हा!" ही म्हण माझ्या वाचनांत आली म्हणजे मला वाटूं लागतं, जर खरोखरच या म्हणीवर कुणाचा विश्वास बसला तर

त्यामुळं जगांत केवढा गोंधळ उडेल! गंभीर मुद्रेचे रोडके तत्त्वज्ञ हंसत सुटतील व त्यांना वेड लागलेलं आहे अशी भीति वाटून त्यांच्या परिचितांच्या मुद्रेवरील हास्य लुप्त होईल! ज्यांचं दंतप्रदर्शन म्हणजे मोठी शिक्षा वाटावी असलीं गलिच्छ माणसं स्वतःच्या आरोग्यासाठीं इतरांना हैराण करून त्यांचं आरोग्य बिघडवितील!

आणि स्थूल प्रकृतीचीं माणसं?

त्याचे हाल तर विचारूंच नका! बिचारे जरा कुठं हंसूं फुटलं तर चटकन् पोटाचा घेर वाढावयाचा या भीतीनं तोंडं हिरमुसलीं करून बसतील, व त्यामुळं स्थूलपणा कमी न होतां मुद्रेवर मात्र स्मशानकळा येऊन इतरांची स्थिति अनुकंपनीय करून सोडतील!

आयुष्यांतील यश असं हास्य—लकेरींतून जन्म पावत नसलं तरी या हास्याची महति मात्र थोडी थोडकी नाहीं. ज्या माणसाच्या मुद्रेवर मोहक हास्य विलसत असतं तो माणूस कोणाला हवासा वाटत नाहीं? किती लवकर असल्या माणसाबरोबर आपण मनमोकळेपणानं बोलूं लागतों! त्या हास्यात त्याच्या अन्तःकरणाचं जणूं प्रतिबिंब पडलेलं असतं व त्यामुळं त्याच्याशीं बोलतांना मन फाजील शंकाकुल होत नाहीं. एखाद्या समारंभाला जावं. तेथें टेबलाभोंवतीं गंभीर मुद्रेचे स्त्री—पुरुष बसलेले असावे आणि इतक्यांत..........

पण कल्पना कशाला पाहिजे! एक प्रत्यक्ष अनुभवच सांगतों. गेल्या वर्षी दक्षिण हैद्राबादेस व्याख्यानानिमित्त गेलों असतांना एका प्रतिष्ठित ठिकाणीं मला चहाचं आमंत्रण आलं. या ठिकाणचं आमंत्रण येणं म्हणजे मोठा सामाजिक मान आहे अशी तेथील चार पांच जणांनीं माझी कल्पना करून दिली. त्यामुळं मी तें आमंत्रण स्वीकारून वेळेवर त्या ठिकाणीं

हजर राहिलों. मी दिवाणखान्यांत पाऊल टाकलं तों चहाचा समारंभ बराच थाटाचा केल्याचं मला दिसून आलं. चहासाठीं बोलाविलेलीं माणसं अगदीं मोजकीं म्हणजे फार तर आठ नऊ असावींत; एकंदर समारंभ मोठा कलायुक्त व वैभवाचं ठळक प्रदर्शन करणारा असाच होता. औपचारिक पद्धतीचे नमस्कार–चमत्कार झाल्यानंतर आम्ही टेबलाभोंवतीं बसलों व मीं हळूंच निमंत्रितांचे चेहेरे न्याहाळून घेतले. दोन पुरुषांच्या मध्यें एक स्त्री अशी युरोपीय सुभग पद्धतीचीं बसलेलीं तीं सुंदर परिवेषातील माणसं मला विलक्षण गंभीर मुद्रेचीं वाटलीं. त्यांच्या हालचालींत मनमोकळेपणा नव्हता. कुणाला एखादा प्रश्न विचारावा तर त्याचं त्रोटक उत्तर मिळे व लगेच पूर्ववत् गंभीर चेहेरे ! एक दोनदां केलेला माझा विनोदाचा प्रयत्नही फसला ! चहा घेतांना जणूं तो घशांत अडकत आहे असं मला वाटलं. सर्वांच्या मुद्रेवरील तो गांभीर्याचा भाव मला अगदीं असह्य वाटला. केव्हां एकदां चहा संपतो व तेथून निसटतों अशी मनाची व्याकूळ स्थिति झाली. इतक्यांत जिना धाडधाड वाजवीत एक व्यक्ति लगबगीनं वर आली. थोडासा उशीर झाल्याबद्दल दिलगिरी प्रदर्शित करून ते मजजवळ येऊन बसले व हंसत हंसत मजबरोबर त्यांनीं बोलण्यास सुरवात केली ! सर्व दारें बंद करून घेतलेल्या खोलींत उबट हवेनं जीव गुदमरत असतांना थंडगार वाऱ्याची झुळूक यावी व मन एकदम प्रसन्न व्हावं अशी माझ्या मनाची स्थिति झाली ! मी त्या माणसाकडे निरखून पाहिलं. खरं विचारल तर तो कुरुपांत जमा झाला असता ! तरीपण इतकं असूनहि मला तो माणूस अतिशय आवडला ! त्याच्या डोळ्यांत जें हास्य खेळत होतं त्यांतील रंग पाझरून जणूं त्या मुद्रेवरील कुरूपपणा त्यानं धुवून टाकला होता व क्षणभर इतर आमंत्रितापेक्षां त्याचा चेहेरा जास्त मोहक वाटला.

हास्याची मौज ती हीच! प्रसन्न हास्य म्हणजे एक अनिर्वचनीय जादू म्हटली पाहिजे! लोखंडाचं सुवर्ण करणारा परीस तयार करण्याची अनेक कल्पकांनीं पराकाष्ठा केली; पण अक्षरशः जादूगिरीचे गुण अंगांत असलेला हा मोहक हास्याचा परीस अलौकिक नव्हे काय? ज्याच्यामुळं कुरूपतेला सौंदर्याचा साज चढतो तो काय साधासुधा परीस म्हणतां येईल?

मला वाटतं, आजकालच्या राष्ट्रीय पुढाऱ्यांत महात्मा गांधीइतका बेढब मुद्रेचा दुसरा देशसेवक दाखविणं कठीण जाईल! पण गांधीजींच्या मुद्रेवर सोज्वळ व प्रेमळतेनं खुललेलं हास्य झळकूं लागलं कीं विस्मयानं चकित व्हावं असा त्या चेहऱ्यांत फरक पडल्यासारखा भास होतो. मुद्रेंतील कुरूपपणा त्यानिर्व्याज हास्यांत जणूं वितळून जात हळूहळू त्यावर मोहकतेचा साज चढत आहे असं वाटूं लागतं. पंडित जवाहरलाल नेहरूंनीं आपल्या इंग्रजी आत्मचरित्रांत गांधीजींचं स्वभावचित्र रेखाटतांना त्यांच्या हास्याचा पुढीलप्रमाणं उल्लेख केलेला आहे. "गांधीजींच्या मुद्रेवर हास्य झळकूं लागलं कीं एखाद्या कुंद झालेल्या खोलींत थंडगार वाऱ्याची झुळूक यावी इतका आल्हाद मनाला होतो."

मार्टिन ल्यूथरनं आपल्या पत्नीला एक नामांकित प्रशंसापत्र दिलं आहे. तो म्हणतो, "व्याख्यानानिमित्त व प्रचारासाठीं ठिकठिकाणीं फिरतांना मला विरोधकांशीं जी झुंज खेळावी लागे, जे मर्मभेदक अपमान सहन करावे लागत, त्या सर्वांचे व्रण माझ्या प्रिय पत्नीच्या मुखावरील हास्याकडे बघितलं कीं तात्काळ बुजून जात व खचलेलं मन चैतन्यानं फुलून जाई."

युरोपांतील हुकूमशाहांचा विचार करतांना त्यांचा उर्मटपणा, बेफिकिरी, मग्रूरी यांचा नेहमीं उल्लेख होत असतो. लोकशाही राष्ट्रांचे प्रधान कसे

हंसतमुख असतात! पण तेच हे दुष्ट हुकूमशहा पाहा. त्यांना दिलदार हास्याची जणूं देणगीच नाहीं.

पण हिटलरच्या बाबतींत तरी त्याचा दुष्टपणा, कावेबाजपणा त्याच्या हास्यांत प्रतिबिंबित झालेला आहे असं म्हणावयास मी तयार नाहीं. मीं हिटलरचं एक अत्यंत उद्बोधक असं चित्र पाहिल्याचं आठवतं. गोबेल्सला जेव्हां 'एडा' नांवाची मुलगी झाली त्यावेळीं त्याच्या घरीं हिटलर भेट द्यावयास आल्याचं तें चित्र 'लाइफ' या चित्रमय साप्ताहिकांत मीं पाहिलं आहे. त्या चित्रांत त्या तान्ह्या मुलीनं हंसावं म्हणून हिटलर निरनिराळ्या तऱ्हेच्या तिला वाकुल्या दाखवीत आहे, वेडींवाकडीं तोंडं करीत आहे, शिटी वाजवीत आहे असा सुंदर प्रसंग पांच सहा चित्रं देऊन दाखविला आहे. तो हृदयंगम देखावा पाहिल्यानंतर हिटलर हा अमानुष राक्षस आहे असं म्हणावयास कोण धजेल? आयुष्य ही एक रंगभूमि आहे. येथें आपण कोणत्या तरी तत्त्वप्रणालीचा अभिनिवेश धरून मिरवत असतो. कुणी लोकशाही राष्ट्रांच्या बाजूनं रंगभूमीवर येतात; कुणी हुकुमशाहीचं सोंग घेऊन येतात. पण त्या सोंगावरून त्यांचं स्वरूप तें तेंच असं म्हणणं चुकीचं नव्हे कां?

फ्लॉरेन्स नाइटिंगेलबद्दल असं सांगतात कीं, बिछान्यावर तळमळत पडलेल्या रोग्यांकडे स्मितयुक्त मुद्रेनं बघत ती हळूहळू जाऊं लागली कीं त्या प्रेमळ हास्याच्या धवल चंद्रकिरणाचे थंडगार तुषार अंगावर पडल्यासारखं रोग्यांना वाटून ते क्षणभर आपल्या वेदना विसरत व तिजकडे पाहून स्मित करूं लागत. हास्याला त्याच्याइतकं मोहक दुसरं कोणतं थोर प्रशंसापत्र देतां येईल?

मीं ज्या दोन व्यक्तींचं हास्य अनुभविलं आहे त्या व्यक्ति म्हणजे सी. एफ्. ॲण्ड्र्यूज व चंद्रशेखर रमण! ॲण्ड्र्यूज यांच्या मुद्रेकडे बघितलं म्हणजे त्यांच्या नेत्रांत जी आर्तता असे ती भयंकर विलक्षण वाटे. डोळ्यांत कसलं तरी दुःख ओथंबून राहिलेलं व मुद्रेवर मात्र कोमल हास्यरेखा अशी त्यांची ऋषितुल्य मूर्ति माझ्या जणूं नजरेसमोर उभी आहे! दाक्षिण ऑफ्रिकेला जाऊन आल्यानंतर त्यांनीं फर्ग्यूसन कॉलेजला भेट दिली त्यावेळीं नामदार शास्त्री यांनीं केवढी बहुमोल कामगिरी आफ्रिकेंत केलेली आहे याचं ते वर्णन करीत होते. इतक्यांत ते म्हणाले " मि. शास्त्री सध्या फार आजारी आहेत! त्यांचा आजार चिंताजनक आहे!" हे शब्द उच्चारतांच त्या नेत्रांत जी आर्तता चमचमली तिजकडे बघवेना! पण क्षणभरानं त्यांच्या चेहेऱ्यावर तें पवित्र हास्य विलसूं लागलं व जणूं छातीवरचं मोठं ओझं उचलल्याप्रमाणं आम्ही निश्वास टाकला.

रमण यांचं हास्य ॲण्ड्र्यूज यांच्यापेक्षां अगदींच निराळं! ॲण्ड्र्यूज यांच्या हास्यांत शांतपणा, कोमल हळुवारपणा भरलेला, तर एखाद्या गुंड मुलानं मोठ्यानं खदखदून हंसावं अशी रमण यांची हास्याची पद्धत! डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या सुवर्णमहोत्सवाच्या वेळीं ते मुख्य पाहुणे म्हणून आलेले होते. त्यावेळीं त्यांच्या हास्याचा चमत्कार अनुभवण्याचा मजवर प्रसंग आला. रमण यांची सावळी व तेजदार मुद्रा पाहतां त्यांच्या नेत्रांतून जणूं तेज ओसंडत आहे असं वाटावं! हंसतांना इतका मनमोकळेपणा कीं, एखाद्या घनगर्जनेसारखा तो वाटावा! आणि तें हास्यही असं प्रसन्नतेनं ओथंबलेलं कीं, त्यांच्याकडे बघतांच स्वतःच्या दुर्बल गांभीर्याचा राग यावा व आपण त्यांच्यापेक्षां वृद्ध, जर्जरित आहोंत असा विचित्र

भास मनाला वरचेवर व्हावा ! अगदीं बेछूट चौफेर गडगडणारं हास्य ! जणूं आनंदाचा दूधसागर त्यांतून वाहतो आहे ! आत्मविश्वास, पराक्रम व जीविताबद्दल अपरंपार कौतुक यांच्या कोमल तंतूनीं जणूं त्या हास्याची वीण घडविलेली ! असलं उल्हासानं रसरसलेलं, तेजःपुंज व भूकंपाप्रमाणं गद्गदून सोडणारं हास्य मीं इतरत्र कुठं पाहिलेलं नाहीं.

याच्याउलट कांहीं कांहीं लोकांच्या मुद्रेवर इतकं अजागळपणाचं हास्य खेळत असतं कीं, त्यांचं तें हास्य जणूं त्यांच्या निर्बुद्धपणाची ठळक जाहिरातच करीत असतं. केव्हांहि पाहा, त्यांचा चेहेरा हास्यानं लिडबिडलेला ! त्यावर गांभीर्य औषधाला म्हणून सांपडावयाचं नाहीं ! असलं ढिलं हास्य असण्यापेक्षां मुद्रेवर गांभीर्याचा कायमचा छाप असलेला पत्करला ! मुद्रेवर स्मित खेळावं हें खरं; पण त्यालाहि मर्यादा आहे. चोवीस तास जर एखादा हंसरा चेहेरा दाखवूं लागला तर पाहणाराला त्याचा तिटकारा येणारच ! ही गोष्ट लक्षांत घेऊन कीं काय, लॉर्ड चेस्टरफिल्ड यांनीं फ्रान्समध्यें शिक्षणासाठीं राहिलेल्या आपल्या चिरंजिवाला जीं पत्रं पाठविलीं त्यांत मुद्रेवर हास्याचं प्रमाण कितपत असावं याबद्दल एक खास पत्र लिहून चर्चा केलेली आहे.

त्या पत्रांत चेस्टरफिल्डसाहेब स्पष्टपणें इषारा देतात—“ तूं समाजांत नेहमीं मिसळत जा; चांगले चांगले समारंभ टाळत जाऊं नकोस. या सामाजिक उत्सवांच्या प्रसंगीं नेहमीं हंसत मुद्रा ठेवीत जा ! मात्र एक गोष्ट विसरूं नको ! ज्या माणसाची मुद्रा नेहमीं हंसरी असते तो सामान्यतः अजागळ व वेंधळा समजला जातो. त्याच्या मुद्रेवरील स्नायु त्याच्या ताब्यांत नाहींत अशी लोकांची कल्पना होते. त्यामुळं लोक त्याला बावळट

समजून त्याची चेष्टा करूं लागतात! तरी ही गोष्ट ध्यानांत ठेवून वाग. आपली मुद्रा हंसरी पाहिजे. तशी ती मधून मधून गंभीरहि ठेविली पाहिजे!"

जगांत जसे हंसऱ्या चेहऱ्याचे विदूषक दृष्टीस पडतात, तसंच जन्मांत केव्हां तरी एकदांच हंसणारे विचित्र लोकहि दृष्टीस पडतात! असं सांगतात कीं, दुसरा फिलीप हा आयुष्यांत एकदाच हंसला व तेहि सेंट बार्थोलोम्यूच्या कत्तलीची आनंददायक बातमी ऐकल्यानंतर! कार्लाइलनं आपल्या 'सॉर्टर रिसार्टस' या जगद्विख्यात ग्रंथांत प्रो. टॉयफेलसड्रॉख नांवाच्या एका विचित्र तत्त्वज्ञाचं विलक्षण रहस्यमय स्वभावचित्र रंगविलेलं आहे. या तत्त्वज्ञानं मानवी जीविताचीं सर्व भीषण, बीभत्स, कटु अंगें-उपांगें अनुभवलीं व निरीक्षिलीं होतीं व त्यामुळं जीविताबद्दल त्याची अत्यंत निराशमय वृत्ति झाली होती. संबंध आयुष्यांत तो एकदांच हंसला; पण काय चमत्कार! तें हंसूं फुटतांच जादूगिरी करावी त्याप्रमाणं त्याचं मतपरिवर्तन झालं व जीवनाबद्दल त्याचं अनुकूल मत झालं. ज्याच्या मुद्रेवर कधींहि हास्य झळकूं शकत नाहीं तो कोणतींहि घोर कर्मं करूं शकेल, नव्हे त्याचं जीवितच विषपूर्ण असतं असं आपलं स्पष्ट मत कार्लाइलनं दिलं आहे.

पण कार्लाइलपेक्षाही जास्त हृदयंगम रीतीनं हास्याची तरफदारी एका तरुण महाराष्ट्रीय कवीनं केलेली आहे व तो कवि म्हणजे लहान वयांत अप्रतिम काव्यरचना करणारे कवि शांताराम आठवले. उज्ज्वल भविष्यकाळ असलेला हा बालकवि आपल्या एका सुंदर गीतांत म्हणतो—

मधु हास्य उजळुं दे तव वदना
दिन हास्याविण जावो न सुना

कोठुन आलों, कुठें जायचें ?
प्रश्न हे न कधिं संपायाचे
चिंतातुर का व्यर्थ व्हायचें
तारील निराशावाद कुणा ?

जीवनाबद्दल इतक्या संक्षिप्तपणं व इतक्या सुंदर शब्दांत दिलेला संदेश एखाद्या महाकवीला शोभून दिसावा इतका हृद्य व बहुमोल आहे !

मुद्रेवर खेळणाऱ्या हास्यावरून स्वभावाची परीक्षा करतां येते हें विधान सर्वस्वीं खरं म्हणतां येणार नाहीं. माणसाचं मन सागराप्रमाणं गंभीर व सखोल असतं. त्यांच्या तळचीं रत्नं अशीं मुद्रेवरील हास्यांत तरंगतांना थोडींच दिसणार? तेव्हां मुद्रेवर चमकणाऱ्या हास्यावरून व्यक्तीच्या मनाचा धांदलीनं अंदाज बांधणं योग्य ठरणार नाहीं. चेहेऱ्यावर शांतपणाचं स्मित खेळत असतांना अंतःकरणांत विपारी कल्पनांचा धूर वागविणारे दुष्ट, दुटप्पी तऱ्हेचे लोक जगांत सांपडत नाहींत असं नव्हे. तरी पण माझ्या मतें गंभीर मुद्रेच्या दुष्टापेक्षां हंसऱ्या मुद्रेचा दुष्ट बरा ! दोघं दुष्ट व विघ्नसंतोषी खरे; पण निदान अंतःकरणांतला विषारीपणा चेहेऱ्यावर चमकूं न देण्याचा सभ्यपणा तरी तो दाखवीत असतो आणि ही गोष्ट कांहीं साधी नव्हे.

कांहीं कांहीं लोकांची मुद्राच अशी विचित्र घडणीची असते कीं, कां कुणास ठाऊक, त्या मुद्रेवर हास्य मुळीं शोभतच नाहीं. एखाद्या कुरूप स्त्रीनं पेन्ट-पावडरीचं पलिस्तर तोंडावर मारावं असं कृत्रिम तें दिसतं ! त्यामुळं ती मुद्रा सुधारण्याऐवजीं अधिकच विद्रूप होते. अंधारांत वीज चमचमली कीं तो काळोख जास्तच भयाण वाटावा अशी त्या हास्यामुळं मुद्रेची स्थिति होते. पण खरी मौज अशी आहे कीं,

काव्याप्रमाणं खरं हास्यहि अंतःकरणांतून जन्म पावत असतं. त्याचे रंग पेन्ट-पावडरींतून मिळणारे नसतात. त्याची सोज्वलता व कोमलता जन्मजात असते. बाह्योपचारांनीं त्याची घडण जमणार नाहीं अगर शास्त्रीय उपकरणांनीं ऊन पाडावं तसा आनंदाचा कोवळा प्रकाश त्यांतून देतां येणार नाहीं! मोहक हास्याचं पुष्प मनांत विकसन पावत असतं. त्याच्या पाकळ्या अंतःकरणांतून तयार झालेल्या असतात. त्याचा गंध उंची अत्तराची शिंपड करून थोडाच संपादन करतां येणार ?

( मनोहर )

# पुनः नको ! ७

सफर म्हणून सिंहगडला जायची कल्पना निघताच आम्हीं सर्वांनीं ' वा ! उत्तम ! ' असा आनंदोद्गार काढला. विशेषतः पुण्याहून चालत चालत थेट गडावर जायचं ही कल्पना तर आम्हीं ' कबूल ! कबूल ! ' असं अधीरपणं म्हणत उचलून धरली. आमचा सर्वांचा आरडाओरडा आराम-खुर्चीत पडून गोपुमामा मुकाट्यानं ऐकत होते. कौतुकानं ते आम्हांकडे पाहत होते. इतक्या उतार वयातही त्यांच्या मुद्रेवर चमकणारं आरोग्याचं तेज एखाद्या तरुणाला हेवा वाटावा असं होतं. त्यांचे विशाल बाहु, पिळदार दंड, पोलादी पोटऱ्या पाहून पूर्ववयांत त्यांना तालमीचा केवढा जबरदस्त नाद असला पाहिजे याची कल्पना न सांगतांहि करतां आली असती. आमच्यापैकीं कुणीतरी त्यांच्याकडे वळून म्हटलं,

' मामा, तुम्हीदेखील आलं पाहिजे चालत आमच्याबरोबर बरं का !' त्यावर कौतुकानं हंसत मामा म्हणाले,

' आतां माझे दिवस आहेत कां रे असली चढउतर करण्याचे ? आतां मी थकलं घोडं झालों. आमच्या काळीं आम्ही खूप असले हौशी कार्यक्रम केले. लांब लांब पायीं दौडत गेलों, लहान-मोठ्या कुस्त्या मारल्या, पोहण्याच्या शर्यती खेळलों,—सिंहगड तर आम्ही घराचा जिना चढून वर जावं असा सहज चढत असूं. पण आतां जीव थकला. आतां आमचे डोळे विश्रांतीकडे लागले आहेत ! आतां पराक्रम करण्याचे दिवस तुमचे ! एक काळ आम्ही सिंहगडला तुमच्याप्रमाणं चालत गेलों, गंमती–मौजा केल्या, थंडी–वाऱ्यांत हिंडलों–फिरलों. एकदां झालं तें पुरे ! आतां पुनः नको !"

मामाचं तें शेवटलं वाक्य ऐकतांच मला दुसऱ्या एका व्यक्तीनं उद्गारलेल्या अशाच वाक्याची आठवण झाली. गरिबींतून वर येऊन हे सद्गृहस्थ कराचीला इंजिनियर म्हणून नांवलौकिकास आलेले होते. माझी व त्यांची अहमदाबाद स्टेशनवर योगायोगानं गांठ पडली. परप्रान्तांत दोन महाराष्ट्रीय दृष्टीस पडले कीं साहजिकच त्यांच्यांतला आडपडदा दूर होऊन ते लगेच सलगीनं बोलूं लागतात. ते व मी गुजराथ एक्सप्रेसनं मुंबईला जात होतों. स्टेशनवर वाचण्यासाठीं आम्हीं कांहीं वर्तमानपत्रं विकत घेतलीं होतीं. बराच वेळ गप्पा मारल्यानंतर आम्ही वर्तमानपत्रं घेऊन चाळूं लागलों. इतक्यांत माझ्या नजरेस कायाकल्पाची जाहिरात दृष्टीस पडली. तेव्हां त्या वृद्ध व तेजस्वी मुद्रेच्या गृहस्थाकडे वळून मीं म्हटलं,

" ही पाहिलीत कां कायाकल्पाची जाहिरात. पंडित मालवीयांवर केलेल्या प्रयोगाची मोठी सुरस हकीकत दिली आहे." त्यावरून बोलणं निघतां निघतां मी त्यांना म्हणालों,

'तुमच्यासारख्या संपन्न व अधिकारी माणसानं जरूर हा प्रयोग करून पाहावा !'

त्यावर आपलं पांढऱ्या केसांनीं भरलेलं मस्तक चोळल्यासारखं करीत ते म्हणाले,

'नको रे बाबा ! कुणीं फुकट प्रयोग करण्याचं कबूल केलं तरी नको !'

"कां हो ?"

'एकदां तारुण्याची बहारी अनुभविली ती पुरे. पुनः नको !'

मामांचे शब्द ऐकतांच गाडींत ऐकलेल्या या उद्गारांची मला आठवण झाली व वाटलं,

"पुनः नको ! पुनः नको !"

असंच सर्वजण आयुष्याच्या सायंकाळीं उद्गार काढत असतील ?

होय. जेव्हां जीवनांतला संधिप्रकाश आपल्या मृदु व कोवळ्या शोभेनं वातावरण खुलवितो, त्यावेळींच पुनर्जन्म, पुनर्यौवन यांबद्दलच्या कल्पनांनीं मन भरून जातं. डोंगर चढून वर गेल्यानंतर आपण मागं नाहीं वळून पाहत ? आयुष्याचीं गिरिशिखरं चढतां चढतां थकलेल्या स्थितींत आपण पायानं तोडलेली वाट नजर सहज मागं टाकून पाहावी यांत नवलाचं कांहीं वाटण्याचं कारण नाहीं.

तरुण वयांत मन उल्हासाच्या निळसर लाटांवर तरंगत असतांना पुनर्जन्माची कल्पना क्वचितच मनाला स्पर्श करते. त्यावेळीं अंतःकरणांत आनंद उसळत असतो, भावना आशेनं पुलकित झालेल्या असतात, जीवन ही एक कधीं न संपणारी फुलबाग आहे, तिच्यांतली रंगीबेरंगी फुलं कधीं

हंसायचीं थांबणार नाहींत, पांखरांची आनंदी किलबिल सदैव चालणार, वातावरणांत मंद गंधाची दरवळ नेहमींच राहणार, वृक्षांचे कोंवळे पल्लव आपला तांबुसपणा कधीं बदलायचे नाहींत, वेलींचा ताजा पोपटी रंग आपलं तेज कधीं सांडणार नाहीं अशा प्रबल कविकल्पनांची जादू मनावर असते त्यावेळीं. अंगांत खेळणारं चैतन्य विद्युल्लतेप्रमाणं मनांतही चमकत असतं. डोळयांत आलेलं जिवंतपणाचं पाणी विचारांची, आकांक्षांची व भावनांची रोपटीं भिजवीत असतं. अरुणप्रभेची मन्द खुलावट पूर्वेच्या गालांवर तशीच झिरझिरीतपणें पसरलेली सतत राहील अशी दृढ भावना असते. पण जेव्हां फुलबागेंतून बाहेर पडल्यानंतर पुढचा खडकाळ मार्ग लागतो, सपाट व स्वच्छ रस्त्याऐवजीं मध्येंच खंदक आडवतो, सुगंधी लतांऐवजीं वाटेंत बाभळ रस्ता आडवून उभी असते, पूर्वेच्या अरुण-प्रभेच्या ऐवजीं पश्चिमेच्या मुद्रेवर खिन्नतेची सूक्ष्म छटा मारूं लागते त्यावेळीं मनांत पुनर्जन्माची कल्पना डोकावूं लागते. तोंपर्यंत तांब्यांनीं वर्णिलेल्या रसिकाप्रमाणं माणसाचा **'कळया कळयांत विहार'** चाललेला असतो. उल्हासानं फुललेलं मन **'आनंदी आनंद गडे। जिकडे तिकडे चोहिकडे'** असलं प्रसन्न गीत गात असतं. पुष्प–वाटिकेंतील विहार असाच सदैव चालू राहणार अशा कविकल्पनेंत मन बेभान असतं. कोणत्याही व्यावहारिक भूमिकेवरून जगताकडे बघावयास मन नाराज असतं. विचार पायानं जमिनीवर चालावयास तयार नसतात; कल्पनेच्या पंखावर आरूढ होऊन निळसर आकाशांत अगर हंसऱ्या तारकांशीं गुजगोष्टी करण्यांत मन दंग असतं. जाईची वेल फुलांनीं डंवरावी असं मन आनंदमय कल्पनांनीं पुष्पित झालेलं असतं. शरिरांत स्फुरणारं चैतन्य मनाला जादूनं भारून कसल्या तरी काल्पनिक व रमणीय विश्वांत त्याला अडकवून ठेवतं.

अशा परिस्थितींत पुनर्जन्माचा विचार मनांत कसा यावा? ह्याच जन्म जिथं कधीं अंत पावणार नाहीं अशी मनाची खात्री असते, तिथं पुनर्जन्माची कल्पना मनांत कशी डोकवावी?

पण जेव्हां मनांतलं चांदणं अंधुक होऊं लागतं व गरम रक्त निवूं लागतं, त्यावेळीं 'पुनः जर जन्म मिळाला तर आपण तो खुषीनं घेऊं काय?' असा प्रश्न मनाला स्पर्श करूं लागतो. या प्रश्नाचं उत्तर जरी नकारार्थी असलं तरी त्याचा अर्थ,जीवनाची ही पायपीट केवळ व्यर्थ होती अशी भावना त्याच्या मुळाशीं आहे, असा नव्हे. त्याचा अर्थ एवढाच कीं, वाट चालून चालून पाय आतां आंबले आहेत, त्यांना विश्रांतीची जरुरी भासूं लागली आहे व आतां लवकरच आराम करायला मिळणार या आशेनं ते मार्ग कष्टानं चालताहेत. जगाचं खेळणं खेळून आतां मूल दमलं आहे व मातेच्या अंकावर पडण्यासाठीं तें उत्सुक झालं आहे. रंगभूमीवर नाचून नाचून पाय दमले आहेत व आतां शेवटच्या पडद्याची फक्त आशा उरली आहे. मृत्यूची भीति या शिणलेल्या जिवाला वाटत नाहीं; तर एखाद्या प्रेमळ मातेला तान्हुल्यानं अधीरपणं बिलगावं असा जीव मृत्यूच्या जवळ लाडीगोडी लावण्यासाठीं धडपडत आहे. शाळेंतली धांदल–गडबड संपल्यानंतर मुलाचे आतां घराकडे डोळे लागले आहेत. सातासमुद्रांतून फिरलेली नौका आतां बंदराकडचे दिवे उत्सुकतेनं न्याहाळीत आहे. आतां तिला पुनः वळून समुद्राच्या लाटांवर डौलानं व ऐटीनं तरंगत फिरण्याची इच्छा नाहीं. विश्रांतीसाठीं ती अधीर झाली आहे.

पुनः जन्म घेण्याचा प्रसंग आला तर तो नको याचा अर्थ निराळा व 'मानवी जीवनांत कांहीं राम आहे काय?' या प्रश्नांतला अर्थ निराळा.

नव्हे, या दुसऱ्या प्रश्नांत कांहीं अर्थ नाहीं असाच कर्तबगार माणूस आपला निर्णय देईल. जगांतल्या कोणत्याही कर्तृत्वशाली माणसाला तुम्ही हा प्रश्न टाका; तो ऐकतांच तुमच्या खुळेपणाबद्दल त्याला हसूं फुटल्याशिवाय राहणार नाहीं. इतकंच काय, तो चिडून तीव्र स्वरांत म्हणेलदेखील, 'वेड्या, जीवनांतला राम विचारतोस? अरे, खुद्द रामायणांत नाहीं इतका राम या जीवनांत आहे, समजलास?' आणि असं जर कुणीं उत्तर दिलं तर त्याबद्दल नवल वाटण्याजोगं कांहीं नाहीं. कारण प्रत्येक यशस्वी थोर पुरुष तुम्हांला म्हणेल, माझं आयुष्य म्हणजे विलक्षण साहसांनीं, अकल्पित संकटांनीं, चित्रविचित्र आशा-निराशांनीं भरलेली एक अद्‌भुतरम्य कादंबरी होऊन गेली. त्या साहसांना तोंड देतांना माझी वीरवृत्ति अंकुश मारावा अशी जागृत राही, संकटांबरोबर झुंज खेळतांना मनाचं तेज सारखं स्फुरत राही, आशा-निराशांच्या आन्दोलनांत मीं अपूर्व अशा अनुभवांचं रसपान केलं. आयुष्याचं हें दंडकारण्य ओलांडीत असतांना मला त्रासही कमी नाहीं झाला; पण या त्रासाला समाधानाची, संतोषाची व खुषीची सोनेरी झालरही होती. पण गड्या, पुनः मात्र तें अरण्य तुडवायला सांगूं नकोस. एकदां पल्ला मारला तेवढा पुरे झाला. आतां पायांत ताकद उरलेली नाहीं; मनाचा दमदारपणा सैलावला आहे; उत्साह ओसरत चालला आहे! आतां मी गळून गेलों आहे. आतां मला विश्रांतीशिवाय दुसरं कांहीं नको. एकदां अरण्यांतून पायपीट केली ती पुरे. पुनः नको!

याच्या उलट स्वतःच्या आयुष्याबद्दल संतापानं अथवा उद्वेगानं चरफडत बोलणारीं माणसं दिसतात, नाहीं असं नाहीं. 'माझ्या आयुष्यांतला सर्वांत दुर्दैवी क्षण कोणता तर ज्या क्षणीं मी जन्मलों तो' असं चिडखोर-

पणं बोलणारीं माणसं आपण कधीं कधीं पाहतों. युरोपीय ग्रंथकारांपैकीं कांहीं जणांनीं असेच निराशेनं काढलेले उद्गार आपल्या वाचनांत कधीं कधीं येतात; पण या व्यक्तींचा उद्वेग खराखुरा आहे असं क्षणभर मानलं तरी जर उद्यां त्यांच्यावर जीव देण्याचा प्रसंग आला तर ते कितपत खुषीनं तयार होतील याबद्दल मला शंका वाटते.

ए. जी. गार्डिनर या ग्रंथकारानं याबद्दल एक मौजेची आठवण सांगितलेली आहे. ओठांवर जीविताबद्दलच्या विषादाची कितीही भाषा चालविली तरी जीविताबद्दलची आसक्ति त्यामुळं कशी कमी होत नाहीं याबद्दल त्यानं दिलेली हकीगत मोठी मार्मिक व उद्बोधक आहे. जीवनाबद्दल तिटकारा दाखवीत असतां त्या क्षणींही त्याला जीवमात्र कसा बिलगत असतो याबद्दलचं तें उदाहरण आहे.

त्याच्या एका मित्रानं आपल्या एका लेखक–मित्राबद्दल ती गोष्ट त्याला सांगितली. हा लेखक आपल्या नैराश्यपूर्ण विचारसरणीबद्दल प्रसिद्ध होता. त्या दिवशीं सकाळींच त्याची खिन्नता कां कुणास ठाऊक वाढून तो उद्वेगानं म्हणाला होता, " छे ! छे ! ! कशाला घेतला मीं जन्म ! त्यापेक्षां माझा जन्मच झाला नसता तर "—व दिवसभर तो अत्यंत खिन्नतेंत होता. तीन प्रहरीं बोटींतून करमणुकीसाठीं विहार करीत असतांना बुडून मृत्यु येण्याची एक नामी संधि आली होती. पण त्यावेळीं लेखक–मित्र असा कांहीं चांगला वागला कीं, जणूं जीविताला चिकटून बसण्यासाठीं तो धडपडतो आहे. अजूनही तो तोंडानं जीवनाबद्दल चरफडत पण मृत्यूला काळजीपूर्वक टाळीत दिवस घालवीत असला पाहिजे. लहान मुलं कसला तरी खेळ खेळून आपल्या मनाची समजूत करून घेतात. कांहीं कांहीं माणसं लहानापेक्षांही लहान असतात अशी आत्मवंचना करून घेण्याच्या बाबतींत.—

पण मी या लेखक–मित्राला दोष द्यावयाला तयार नाहीं. प्रत्येक जीवमात्र आयुष्याचा पहिला अनुभव घेण्यासाठीं उत्सुक असतो. पहिला प्रवास करतांना तो नेहमींच उत्सुक व उत्साही असतो. प्रश्न येतो तो पुनः प्रवास करण्याची कल्पना निघाली कीं, ती निघतांच एकदम उत्साह मंदावल्यासारखं होतं, मनांत निरुत्साह फोफावतो, पाय जणूं आपोआप ठणकूं लागतात व मुद्रा काळवंडते.

माझे एक प्रोफेसर मित्र आहेत. अत्यंत हालअपेष्टांतून मार्ग काढून त्यांनीं आपलं शिक्षण पुरं केलं. ज्या कॉलेजांत ते आतां प्रोफेसर आहेत त्याच कॉलेजांत त्यांना एकेकाळीं फीची तरतूद करण्यासाठीं कारकुनी करावी लागली होती. कालच ते मजकडे चहासाठीं आले असतांना गप्पा मारतां मारतां सहज सकाळचं वर्तमानपत्र ते चाळूं लागले तों एकाएकीं आश्चर्यकारक बातमी वाचल्यासारखं करीत ते उद्गारले,

ही पाहिलींत कां गंमत ?

"काय हो"

"दिल्लीला म्हणे एक तीन चार वर्षांची मुलगी आहे. तिला पूर्वजन्मांतल्या सर्व गोष्टी बिनचूक आठवतात! सर्व खाणाखुणा, ओळखीचीं माणसं, घरं, रस्ते ती सर्व अचूक सांगते. मौज आहे नाहीं?"

त्यावर सहज मीं प्रश्न केला,

'तुम्हांला जर कुणीं पुनर्जन्माचा वर दिला तर तुम्ही तो स्वीकाराल'?

त्यावर ते एकदम म्हणाले,

"अलबत्! पण एका अटीवर हं!"

"कसली बुवा?"

" ती म्हणजे जो अनुभव घेऊन आम्ही शेवटीं शहाणे झालों तो सुरवातीला अचूक हातीं पाहिजे! हो !! म्हणजे सर्व यातायात मिटली!" व ते हंसले.

मला वाटतं, जर माझ्या प्रोफेसर-मित्रांनीं किंचित् नीट विचार केला असता तर उत्साहाच्या भरांत आपण केवढी विचित्र अट घालीत आहों त्याची त्यांना कल्पना आली असती. इतकंच नव्हे, तर तेच कांहीं वेळानं म्हणाले असते, "नकोरे बाबा ! आम्ही आपली अट परत घेतों !"

मला वाटतं सर्व समंजस माणसं असाच अभिप्राय देतील ! जर जीवनांतील पुढें अनुभवास येणारीं सुखदुःखं अगोदर कळतीं तर त्यांत रहस्यमय काव्य तें काय राहिलं? एखाद्या पाहिलेल्या नाटकांतले प्रसंग पुनः पाहतांना जसा माणूस जांभया देऊं लागतो तशीच या प्रवाशाची स्थिति व्हावयाची. आयुष्यांत पुढें काय घडणार आहे, क्षणभरानं कोणतं संकट दत्त म्हणून उभं राहणार आहे, कोणत्या ज्वालामुखींतून निसटावयाचं आहे याचं जगाला ज्ञान नसतं म्हणून तर त्यांतली सर्व गोडी टिकून राहिली आहे. या अज्ञानामुळंच त्याला नाविन्याची खुलावट आलेली आहे. अचानक आलेल्या संकटामुळं मनांत आश्चर्यतरंग उद्भवत वृत्ति उत्साहित होते यांतच सर्व जीवनांतलं मर्म सांठविलं आहे. ही अनिश्चितता, हें अज्ञान दूर करा!—जीवन हें रहस्यपूर्ण नवलाईची बाब न वाटतां दररोज पायपीट करायच्या रस्त्यासारखं उपेक्षणीय वाटेल.

पुनर्जन्म नको याचा अर्थ 'हा जन्महीं नको' असा नव्हे. त्याचा अर्थ एवढाच कीं, एकदां तिकीट काढून नाटक पाहिलं तें पुरें. पुनः नको ! लांबचा प्रवास मारून आतां शरिराप्रमाणं मनही थकलं आहे. सकाळीं आनंदी किलबिलाट करीत घरट्याबाहेर पडलेलं पांखरूं अन्तराळांत फिरून

फिरून आतां दमलं आहे; पंख फडफडविण्याइतकंही त्राण त्याच्यांत उर-लेलं नाहीं. आतां परत घरट्यांत जाऊन केव्हां पिसांत चोंच खुपसून झोंपायला मिळेल याबद्दल तें उत्सुक झालं आहे. आनंद, आश्चर्य, शोक, कुतूहल, भीति इत्यादि विविधरंगी भावनांचं आकंठ पान केल्यानंतर मनाला आतां पुनः त्या भावनांच्या विलोल नर्तनाचा कंटाळा आलेला आहे. एखाद्या कुशल मातेप्रमाणं निसर्गानं बालकापुढं सर्व तऱ्हेचीं खेळणीं टाकून व त्याला खेळायला प्रवृत्त करून दमविलं आहे; म्हणजे झोपेच्या वेळीं त्याची तक्रार नको. नुसता मातेच्या अंकाचा स्पर्श होतांच त्याचे चिमणे डोळे मिटावे!

पुनर्जन्म नको याचा एवढाच अर्थ. तो शब्द उच्चारतांच त्याबद्दल नकार दर्शविणारा माणूस म्हणत असतो,

"एकदां सिंहगडची सफर खुषीनं केली; **पुनः नको!**"

---

# वेड्या मनाचा खेळ ८

बाहेर पाऊस पडूं लागला व त्यामुळं वातावरण अंधेरल्यासारखं झालं कीं अंगावर मऊ दुलई घेऊन वाचीत पडण्याचा माझा शिरस्ता आहे. वाचनासाठीं अशी पावसाळी हवा सर्वांत उत्तम असं माझं म्हणणं नाहीं. मी स्वतः शास्त्रीय विषयावरील पुस्तकं पहाटच्या गार वाऱ्यांत वाचीत बसतों; तत्त्वज्ञानाचं पुस्तक रात्रीं अन् तेंहि समईच्या मंद प्रकाशांत वाचण्याची माझी संवय आहे. कादंबरी अगर नाटक मी वेळ सांपडेल तेव्हां कुठंहि व केव्हाहि वाचूं शकतों.

—पण काव्य !

काव्याचं वाचन करायला मला असलं पावसानं अंधेरून गेलेलं वातावरण फार आवडतं ! एक तर हवेंत थंडीची थोडीं चमक असते त्यामुळं अंगावर कांहीं तरी गरम असावं असं वाटूं लागतं. पावसाच्या सरींचा जो खिडकीवर आघात होतो व फुटलेल्या तावदानांतून थंड पाण्याचा शिड-

कावा मधून मधून अंगावर येतो त्यामुळं मनांत प्रसन्नतेचं चांदणं खेळूं लागतं; अशा वेळीं एखादं कवितांचं पुस्तक घेऊन वाचण्याचा मला छंद आहे.

गेल्या गुरुवारीं अशीच पावसाळी हवा अवतरली होती. हवेंत थंडीची चमक मारत होती व मधून मधून पावसाच्या सरी येऊन जात होत्या. तेव्हां नेहमींप्रमाणं माझी आवडती दुलई काढली, तिनं सर्वांग लपेटून घेतलं व पडल्या पडल्या जें हाताशीं पुस्तक आलं तें उचलून उघडलं. **गीतगंगा** नांवाचं तें कवितांचं पुस्तक होतं. सहज पानं चाळूं लागलों तो **लो. टिळकांचें निधन** असा मथळा वाचतांच पानं चाळण्याचं थांबविलं व कौतुकानं ती कविता वाचूं लागलों. असल्या विषयावरची कविता तशीच भावनोद्दीपक असेल अशी माझी कल्पना ! पण जेव्हां मीं वाचावयास सुरवात केली त्यावेळीं त्यांत कवीची प्रगट झालेली भोळसट वृत्ति पाहून मनाची बरीच करमणूक झाली. टिळकासारखा अनन्यसाधारण पुढारी मृत्युमुखीं पडलेला पाहून वृक्ष, लता, सागर, महासागर, पर्वत इत्यादि चराचर सृष्टींतील पदार्थ दुःखानं व्याकूळ होऊन कसे शोकदग्ध झाले आहेत याचं कवीनं निष्ठापूर्वक केलेलं वर्णन पाहून बरीच गंमत वाटली. टिळकांचं निधन झालेलं पाहून क्षितिज काळवंडून गेलं आहे; उषेनं सर्वांगाला राख फासली आहे, आकाश मसणवटीसारखं झालं आहे; फुलांच्या मुद्रा भेसूर झाल्या आहेत; ओढ्याचं पाणी एकदम गोठून गेलं आहे; सृष्टिदेवी अश्रू ढाळीत आहे; आकाशांत गिधाडं जमलीं आहेत व घुबडांचा घूत्कार सुरूं झाला आहे; महासागर प्रचंड शोकानं प्राण पाखडतो आहे; मेघ ऊर बडवून घेताहेत; वायु आक्रंदन करीत आहे; वृक्षलता गळयांत गळा घालून रडताहेत; हिमालयसुद्धां थरथर कांपत आहे; गंगायमुना गळा

काढून रडत आहेत; अटकेचे बुरुजही काळवंडून गेले आहेत; सिंधु नदी, कृष्णा–भीमा, सिंहगड, सह्याद्रि, शिवनेरी, रायगड, प्रतापगड इत्यादींनीं रडून रडून अगदीं आकांत केला आहे......!! एक ना दोन!

मला वाटतं, शेंकडा नव्वद कवींना निसर्गविषयक असल्या कल्पनारम्य पण सर्वस्वीं असत्य संकेतांत रमण्यांत आनंद वाटत असतो. आतां उल्ले-खिलेली कविता अपरिपक्व व होतकरु काव्यलेखनाचा नमुना समजला तरी परिणतप्रज्ञ समजल्या जाणाऱ्या कविसम्राटांनींदेखील मानवी सुखदुःखांचीं चित्रं रंगवीत असतांना निसर्गावर जुलूम करून त्याला या सुखदुःखाशीं समरस होण्याला काव्यांतून भाग पाडलेलं आहे. आपल्या सुखदुःखांत कुणी तरी अंशभागी आहे ही कल्पना मानवी बुद्धीला नेहमींच संतोषदायक वाटलेली आहे. आपण अत्यानंदांत असलों तरी जर कुणी या आनंदांत भाग घेणारं नसेल तर तेवढा आपल्या आनंदांतला उत्कटपणा कमी झाल्या-सारखं वाटतं. त्याचप्रमाणं आपण दुःखमग्न असलों म्हणजे आपल्या संकटा-बद्दल कुणी तरी हळुवारपणं सहानुभूति दाखवीत आहे ही कल्पना मनाला सांत्वनाची मलमपट्टी लावते यांत शंका नाहीं. याच्यापुढं एक पाऊल जाऊन माणसाप्रमाणं भोंवतालची सृष्टिदेखील आपल्या अश्रू-हास्यांत सामील होते ही कल्पना कवि–कादंबरीकारांना मोहक वाटून त्यांनीं तिचा जवळ जवळ संकेतच बनविला!

—पण निसर्गाची नजर अशी दक्षतेनं मानवी व्यवहाराकडे रोखलेली असते ही गोष्ट कितपत खरी आहे?

श्रीकृष्णाची मुरली ऐकतांच झाडं–लता डोलूं लागलीं, चराचर विश्व आनंदानं बेहोष होऊन हालूं डोलूं लागलं, धांवता झरा क्षणभर थांबून कौतुकानं त्या संगीतलहरी ऐकूं लागला इत्यादि मुरलीचे प्रताप प्रथमतः

पुराणांतून व नंतर आधुनिक कवींच्या काव्यांतून आपण थोडे थोडके ऐकलेले नाहींत. पण यांत खरेपणाचा भाग किती आहे ? संगीताचा तिटकारा असणारीं फुलं अस्तित्वांत आहेत असं सिद्ध झालेलं आहे. कार्नेशन व सायक्लमेन जातीचीं फुलं संगीत सुरू होतांच नाखुषीनं दुसरीकडे माना वळवितात; त्यांना मुरलीचं काय कौतुक वाटणार ? बर्लिनजवळ मागल्या पायांवर उभे राहिलेलं अस्वल जसं दिसतं असं एक हजार वर्षे वयाचं म्हातारं झाड आहे; समजा, भगवान् श्रीकृष्ण मुरली वाजवीत जर्मनींतून आले असते—तर हें अस्वल नाचूं तर लागलं नसतं ? निरनिराळया झाडांना नांवं देतांना असंच आपण आपल्या वेड्या मनाला मोकळं सोडीत असतों. जर्मनींत टौनस पर्वतावर एक ओक जातीचं झाड उगवतं. त्याचीं पानं शोकमग्न माणसानं मान गुढग्यांत घालून मुळुमुळूं रडावं अशी वांकलेलीं असतात. त्याला 'अश्रू ढाळणारा ओक' असं नांव दिलेलं आहे. हिटलरची धडाडी पाहून तीं पानं आतां कान टवकारून तर पाहूं लागलीं नसतील ? नाझी लोकांचे अत्याचार पाहून तें अश्रू गाळीत बसलं आहे अशी कविता करणारा एकादा ज्यू कवीहि कुठं तरी वणवण भटकत असेल, नाहीं कुणीं सांगावं ? बटरवर्ट नांवाचं झुडूप किडे खाऊन राहतं; आतां इंग्लडच्या किनाऱ्यावर बॉम्बफेंक सुरूं झालेली पाहून राष्ट्रभक्तीनं प्रेरित होऊन किडे पकडून खाण्याचा आपला रोजचा कार्यक्रम तें थोडाच बंद ठेवणार आहे ? फरीदपूरला म्हणे देवळांत प्रार्थनेची घंटा सुरूं झाली कीं भक्तिभावानं मान खालीं घालून परमेश्वराची प्रार्थना करणारा एक पाम जातीचा वृक्ष होता. त्याची श्रद्धाळु वृत्ति पाहून त्याचे पायाशींच हजारों भाविक येऊन लोटांगण घालीत. पण हवेंतील उष्णतेंत जसजसा फरक होत जातो तसतसी झाडांच्या फांद्या—पानंही आपले पवित्रे बदलतात ही माहिती त्यावेळीं कुणाला नसल्यामुळं व विशेषतः एका प्रचंड वादळामुळं तें झाड कलंडतं

झालेलं आहे हें भक्तिभावाच्या उत्साहांत कुणाच्या लक्षांत न आल्यामुळं 'वृक्षांचा हा तुकाराम' मोठा कौतुकाचा विषय असे. केवळ हिंदुस्थानांतच आपल्या भाविकतेचं प्रदर्शन करणारे लोक आहेत असं समजायचं कारण नाहीं. सुधारलेल्या पाश्चात्य देशांतूनही वृक्षांची पूजा करणारीं माणसं थोडी-थोडकीं नाहींत. मध्य–आशियांतील गोबी वाळवंटांत झाडं क्वचितच उगवतात. त्यामुळं जीं कांहीं चार-दोन खुंटं उगवतात त्यांना दैवी अवतार समजून त्याची थाटानं पूजा-अर्चा केली जाते. पूर्वी जर्मनींत एक खूप उंच व लांब लांब फांद्यांचा वृक्ष असे. त्याची पूजा करण्यासाठीं जर्मन वारकरी दोन दोनशें मैलांवरून चालत येत. अरेबियांत कांहीं जुनीं खजुराचीं झाडं आहेत; त्या झाडांतून महंमद फिरत असे म्हणून त्या पवित्र वृक्षांची अजूनही पूजा चालते. पॅलेस्टाईनमध्यें असाच एक वृक्षांमधील पंढरीचा विठोबा आहे; त्याच्या मुळाजवळ अब्राहामला पुरलं आहे म्हणून वारकऱ्यांची त्याच्याभोंवतीं नेहमीं गर्दी असते. पण उद्यां जर जोराचं वादळ सुरू झालं अन् या सर्व पवित्र वृक्षांच्या फांद्या कडाकड मोडून पडूं लागल्या तर खालीं जत्रा करून बसलेल्या वारकऱ्यांना अपघात होऊं नये म्हणून सावधागिरी दाखवून तीं झाडं फांद्या थोडकीच आवरून धरणार आहेत ? ऑस्ट्रेलियांत विल-क्षण झोंप घेणारं मोअर पोर्क नांवाचं घुबड असतं; निजलं म्हणजे त्याला इतकी विलक्षण झोंप लागते कीं, त्याचेजवळ बंदुकीचा बार केला तरी तें जागं होत नाहीं. उद्यां ऑस्ट्रेलियाच्या मुख्य–प्रधानाची प्रेतयात्रा त्याचे-जवळून गेली तरी तें आपली झोंप सोडून थोडंच बावरलेल्या नजरेनं त्या भयंकर राष्ट्रीय हानीचा विचार करीत बसणार ? दुसरे दिवशीं नवीन नेम-लेल्या प्रधानाची मिरवणूक त्या झोंपाळू प्राण्याजवळून नेली तरी त्याचं घोरणं चालूंच राहणार. दोन प्रणयी जीव चोरून आनंदानं रानावनांत

भेटले म्हणजे तेथले लतावृक्ष आनंदानं डोलूं लागतात, पांखरं कौतुकानं किलबिल करूं लागतात असं वर्णन करणारे कादंबरीकार थोडेथोडके नाहींत ! पण उद्यां त्याच प्रणयी जनांच्या भेटीच्या जागीं एखाद्या सुंदर अबलेवर एखाद्या कामांधानं बलात्कार करून तिला तिथं बेशुद्ध स्थितींत फेंकून दिली, अगर तिचा प्रियकर तिला भेटायला येतां येतां मध्येंच साप चावून पलीकडच्या झुडपांत रक्त ओंकून मरून पडला तरी वृक्ष—लता त्याची थोडीच दाद घेणार आहेत ? त्यांना मानवी जीवनांतील आनंद, हर्ष, दुःख निराशा यांजकडे लक्ष द्यावयाला वेळ आहे कोठें ? त्यांचे जे व्यवहार चाल-लेले असतात ते क्षणभर थांबवून ते माणसांच्या हालचालींकडे लक्ष द्यावयाला बिलकूल तयार नाहींत ! कारण निसर्ग स्वभावानं बेफिकीर आहे; त्याला फक्त स्वतःची पर्वा आहे; इतरांच्या उलाढालींत लक्ष घालण्याची तो फिकीर करीत नाहीं. इतकंच नव्हे, तर जो कुणी विशेष तत्परतेनं त्याच्या राज्यांत शिरून तेथली व्यवस्था, कायदे, गंमती पाहूं इच्छिणार नाहीं, त्याला त्याच्या या राज्यांतील आश्चर्यजनक घटनांची कल्पनाही येणार नाहीं. स्वभावतः निसर्ग थंड प्रकृतीचा आहे; मनमोकळेपणा त्याला ठाऊक नाहीं. आपलीं आश्चर्यें बरोबर घेऊन त्यांची जाहिरात करत हिंडणारा तो फिरस्ता नाहीं. त्याच्या जगांतील मौजा, घटना व दंगल—गडबड बघायची असेल तर उत्सुक मनानं व श्रमपूर्वक त्याच्या राज्यांत शिरलं पाहिजे. तरच तेथल्या नवलपूर्ण घटनांची थोडीफार कल्पना येईल.

—आणि खरंच जर क्षणभर आपल्या धडपडींतून मुक्त होऊन आपण या निसर्गाच्या राज्यांत जायचं ठरवलं तर कोण मौजांची, आश्चर्यांची व गंम-तींची लयलूट आपली वाट पाहत उभी असलेली दिसेल ! इतर आश्चर्य-कारक वृक्षांची व वनस्पतींची गोष्ट आपण सोडून देऊं व नेहमीं दृष्टीस

पडणाऱ्या वटवृक्षाचाच क्षणभर विचार करूं. या वृक्षाचं फूल कुणीं पाहिलं आहे? इतर वृक्षांचीं फुलं त्यांच्या फांद्यावर कौतुकानं डोलतांना दिसतात, पण वटवृक्षाचं फूल असं कधीं फांदीवर डौलानं बसलेलं कुणीं पाहिलं आहे? शक्य नाहीं. प्रथम फूल व नंतर फळ असा इतर वृक्षांचा क्रम, तर वटवृक्षाचं केवळ फळच आपल्या दृष्टीस पडतं. तें फळ म्हणजे पुष्पदेंठावर एकत्र झालेला फुलांचा झुपका होय! जेव्हां आपण हें फळ उघडून पाहूं तेव्हांच आंतली ही विनयवती राणी दृष्टीस पडेल. उद्या त्या वटवृक्षाखालीं एखाद्या महान् जगज्जेत्याचं सैन्य येऊन उतरलं तरी ती पडद्यांतली फुलराणी पाकळ्यांचा पडदा दूर करून बाहेर थोडीच डोकावून पाहणार आहे? तिला बघावयाचं असेल तर आपणच ते श्रम घेतले पाहिजेत.

थोर पुरुषांच्या जन्माचे वेळीं सृष्टींत चमत्कार घडत असतात अशी एक समजूत सामान्य लोकांत प्रचलित आहे. तो थोर सत्पुरुष पृथ्वीवर अवतरणार म्हणून चंद्र, तारका उल्हासानं वागडूं लागतात; समुद्राचं हृदय हर्षातिशयानं उचंबळून येतं, त्या मंगल प्रसंगीं पाखरांचं गायन सुरू होतं इत्यादि चमत्कार वर्णन करण्याची चरित्रकारांना संवय आहे! सुप्रसिद्ध चिनी तत्त्वज्ञ कन्फ्यूशियस् याच्या जन्माबद्दल अशीच मौजेची हकीगत सांगतात! पुत्रप्राप्तीसाठीं त्याची आई परमेश्वराची प्रार्थना करीत असतां स्वप्नांत तिला देवदर्शन झालं व त्यानं तिला सांगितलंः तुला अत्यंत बुद्धिमान, चतुर असा मुलगा होईल; मात्र मलबेरी झाडाच्या पोकळींत तूं त्याला वाढवलं पाहिजेस! त्याप्रमाणं मलबेरी झाडाच्या पोकळींत ती जाऊन राहिली. पुत्रजन्माचे वेळीं तिच्याभोंवतीं देवदेवतांची दाटी झाली, सुगंधी द्रव्यांची त्यांनीं चौफेर फेक करून वातावरण गंधमय केलं, स्वर्गीय संगीताच्या लहरी वातावरणांतून येऊं लागल्या व आकाशवाणी झालीः 'तुला पुत्ररत्न झालेलं पाहून स्वर्गस्थ

देवता आनंदानं नाचत आहेत व त्यांनींच हा गाण्याचा फेर तुझ्या अर्भका-भोंवतीं धरलेला आहे !' झाडाजवळच जमिनींतून एकाएकीं थंड पाण्याचा झरा उसळला व सर्व निसर्गात आनंदी आनंद झाला !

खरी वस्तुस्थिति अशी असते कीं, ज्या वेळीं सृष्टीचं स्वरूप पालटलेलं आहे, ती आनंदानं तळपते आहे, हर्षानं नाचत आहे असं आपणांस वाटत असतं, त्यावेळीं वास्तविक सृष्टींत फेरबदल झालेला नसून आपल्या दृष्टींत बदल झालेला असतो. आगगाडींतून जातांना दिसणाऱ्या झाडांप्रमाणं निसर्गाची वृत्ति असते. धांवत्या आगगाडींतून जातांना झाडं धांवताहेत असं आपल्याला वाटतं, वास्तविक तीं जागेवर स्तब्ध असतात; आपण मात्र जलद गतीनं चाललेले असतों. तसंच निसर्गाचं आहे. जेव्हां जेव्हां त्यानं आपलं रूप पालटलेलं आहे असं आपणांस वाटत असतं त्यावेळीं वास्वविक आपल्या नजरेंत व मनोवृत्तींत फरक झालेला असतो. या बदललेल्या नजरेंतून निसर्गाकडे पाहिलं म्हणजे त्यानंहि नवीन रूप धारण केल्याचा आपल्याला भास होत असतो. जेव्हां बालकवि म्हणतात—

सूर्यकिरण सोनेरी हे,
कौमुदि ही हंसते आहे
खुलली संध्या प्रेमानें
आनंदें गातें गाणें

त्यावेळीं आपल्या आनंदी वृत्तीचीं प्रकाश–किरणं टाकून ते निसर्गाकडे बघत आहेत हें स्पष्ट नाहीं कां ? निसर्ग व आपलं अन्तःकरण हीं दोन्ही कसल्या तरी रहस्यमय धाग्यांनीं बांधलीं गेलेलीं आहेत असं रॉबर्ट निकोल खालील ओळींत सांगतो तोहि केवळ कवीच्या मनाचा खेळ नव्हे काय ?

A deep mysterious sympathy doth bind
The human heart to nature's beauties all
We know not, guess not, of its force or kind.

खालील ओळींत वर्डस्वर्थ कवीनं जी निसर्गावर शिक्षकाची कामगिरी सोंपविली आहे तीदेखील कविमनाचा खेळ नव्हे काय ?

One impulse from a vernal wood
May teach you more of man,
Of moral evil and of good,
Than all the sages can.

निसर्गाच्या संगतींत चिमकुल्या ल्यूसीचं शिक्षण कसं सुंदर तऱ्हेनं होईल याचं याच कवीनं जें वर्णन केलेलं आहे तें कितीही हृदयंगम असलं तरी केवळ कल्पनारम्य नव्हे काय ?

The stars of midnight shall be dear,
To her; and she shall lean her ear
In many a secret place
Where rivulets dance their wayward round
And beauty born of murmuring sound
Shall pass into her face.

चिमकुल्या ल्यूसीची बेफिकीर निसर्गाला पर्वा काय ? उद्यां तिचं शिक्षण चालूं असतांना तिची हृदयक्रिया बंद पडली तरी त्याचा नेहमींचा धिमेपणानं चाललेला कार्यक्रम थोडाच बंद पडणार आहे ?

याप्रमाणं निसर्गाचा अखंड कार्यक्रम चालू आहे. मानवजातीच्या सुखदुःखाशीं समरस होण्याइतका हळवेपणा त्याचेजवळ नाहीं. एक प्रकारच्या बेफिकिरीनं त्याच्या स्वतःच्या उलाढाल्या चाललेल्या असतात;

आपलीं कामं क्षणभर बाजूला सारून मनुष्याकडे डोकावून पाहायला त्याला वेळ नाहीं; आणि असलाच तरी त्याचा उपयोग तो स्वतःसाठीं करील. त्याचं स्वतःचं एक निराळंच आयुष्य आहे; त्या आयुष्यांतील घडामोडींत तो दंग असतो; त्याला मानवजातीच्या सुखदुःखांची, आशा–निराशांची, विजय–पराजयांची पर्वा नाहीं. संथपणें त्याचं जीवन चालू असतं. भूकंप होऊन कोट्यवधि जीव प्राणास मुकले तरी लतांवरचीं फुलं हंसतच राहणार! जल-प्रलय होऊन जलपृष्ठावर प्रेतांचा गालिचा पसरला तरी पांखरांची आनंदी किलबिल चालूंच राहणार! आपल्या थोर पुत्रांसाठीं भूमातेनं हंबरडा फोडला तरी झुळझुळ वाहणारा झरा आपलं संगीत थांबवणार नाहीं, उमलणारीं फुलं आपल्या पाकळ्या मिटून घेणार नाहींत, अगर वाऱ्यानं हलणारे वृक्ष दच-कून स्तब्ध होणार नाहींत!

आपण सुखांत अगर दुःखांत असलों म्हणजे हळव्या मनाचा निसर्ग प्रेमळ संवगड्याप्रमाणं आपल्या भावनांना आदर दाखविण्यासाठीं धडपडतो असं आपल्याला वाटतं पण निसर्गाचं मन इतकं कोंवळं नाहीं; तो केवळ आपल्या **वेड्या मनाचा खेळ** असतो.

# पाळण्यांत पाय ९

परवां आमचे मित्र रामभाऊ दाणी यांच्या घरीं जाण्यासाठीं घरांतून बाहेर पडलों तोंच समोरून मांजर आडवं धांवत गेलं ! ज्या कामासाठीं मी चाललों होतों त्यांत माझा स्वतःचा कांहीं संबंध नसला तरी रामभाऊंचा होता व ते माझे परमामित्र असल्यामुळं त्याचं काम तें माझंही काम असंच मी समजत आलों आहे ! रामभाऊंचा थोरला मुलगा भाऊ विलायतेला सिव्हिल सर्व्हिसच्या परीक्षेसाठीं गेलेला होता व ऐन महायुद्धाच्या धामधुमींत तो तिकडे दोन वर्षं असल्यामुळं सर्वांचा जीव टांगल्यासारखा झाला होता. भाऊच्या परीक्षेचा निकाल या आठवड्यांत केव्हां तरी कळावा अशी आमची अपेक्षा होती व कांहीं बातमी कळते कां बघण्यासाठीं मी बाहेर पडलों—

तो तें आडवं मांजर !

मी पळण्याचा प्रयत्न करून त्याला आडवूं लागलों, पण ती वाघाची मावशी माझ्यापेक्षां चपळ असल्यामुळं हां हां म्हणतां पसार झाली व

किंचित् भेदरलेल्या मनःस्थितींत मी रामभाऊंच्या घराचा रस्ता चालूं लागलों.

—पण मौज अशी कीं, मी दाराजवळ जातों तोंच आंतून रामभाऊंनीं मला पाहिलं व धांवत येऊन हर्षातिशयानं मला गदगदा हलवून म्हणाले,

"बापुसाहेब, भाऊ पास झाला! आज मी धन्य झालों! माझी जन्माची काळजी दूर झाली!"

मलाहि ती शुभ वार्ता ऐकून अत्यानंद झाला. रामभाऊ अवघे शाळा-मास्तर! त्यांचा पगार आज अठ्ठावीस वर्षांच्या नोकरीनंतर केवळ पंचा-हत्तर झालेला! तेव्हां किती यातायातीनं व किती धाडसानं त्यांनीं आपल्या मुलाला विलायतला पाठविला असेल याची कल्पनाच केलेली बरी!

मी हर्षभरानं म्हणालों,

"वा! वा! मोठीच बहार झाली! भाऊनं कमाल केली!"

त्यावर रामभाऊ म्हणाले,

"पहिल्यापासूनच मोठा तल्लख बुद्धीचा! मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात असं म्हणतात तें खोटं नाहीं!"

यानंतर जेव्हां ही यशाची बातमी मित्रमंडळींत पसरली त्यावेळीं रामभाऊंवर अभिनंदनाचा वर्षाव झाला व तो वर्षाव करतां करतां प्रत्येक-जण म्हणे,

'मुलाचे पाय पाळण्यात दिसतात म्हणतात तेंच खरं!'

'हा भाऊ जन्मला तेव्हां त्याचे चाळे पहिल्यापासून निराळे! बघूं लागला कीं वाटे, कोणी तरी—'

याप्रमाणं त्या दिवशीं रामभाऊंच्या घरीं पाळण्यांतले पाय उठल्या बसल्या गाजत होते.

"मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात!" ही म्हण कुणीं तयार केली तें मला माहीत नाहीं; पण त्या म्हणीचा कर्ता मोठा धूर्त, चाणाक्ष व शब्द-योजनेच्या बाबतींत कुशल असा मनुष्य असला पाहिजे खास. पुष्कळ वेळां आपण जें बोलतों किंवा लिहितों त्याचा विपर्यास इतरानीं केल्याचं आपण पाहतों. तशीच स्थिति या म्हणीची झालेली असावी. पाळण्यांतल्या मुलाचे फक्त पायच दिसतात, त्याचं डोकं दिसत नाहीं, कारण त्याला त्या वेळीं डोकंच नसतं असाच या म्हणीचा खरा अर्थ कर्त्याच्या मनांत असला पाहिजे. निदान माझा तरी तसा समज आहे. जे या म्हणीचा दुसरा अर्थ करतात त्यांना लहान मुलांना डोकं नसतं हें समजण्याइतकं डोकं तरी नसलं पाहिजे किंवा जगांत इतकीं वर्षे राहूनहि पाळण्यांतल्या मुलाइतकीच त्यांची बुद्धि अनुभवशून्य राहिलेली असावी!

मुलाचे पाळण्यांतले पाय पाहून जर त्याचं डोकं अजमावता आलं असतं तर कोण बहार झाली असती! अगदीं आपले पाय डोक्यावर घेऊन मनुष्य आनंदानं नाचला असता. आतां त्या आनंदाच्या भरांत नाचायला पाय उरले नाहींत याचं त्याला भान उरलं नसतं ती गोष्ट वेगळी. पण बिन-पायाचा नाच करायला या जगांत संधि नाहीं. पायानंच नाच केला पाहिजे व पायांकडे पाहून फार तर पायच दिसतील असाच जगाचा अनुभव आपणांला सांगतो. पायाची दुर्बीण जर अशी डोक्यावर रोखलेली असती तर जगातलीं अर्धीअधिक दुःखं कमी झालीं असतीं; धडपड, धांदल कमी झाली असती आणि डोक्याचा फोटो पाळण्यांतच मिळाल्यानंतर नसत्या आकांक्षा, न झेपणारीं ध्येयें, आवाक्याबाहेरची कामगिरी यांच्या भानगडींत कुणी पडलं नसतं. भावी कालाकडे आशाळभूताप्रमाणं नजर लावून न बसता प्रत्येकजण पायांकडे बघत बसला असता व 'चांभाराचं लक्ष पायांकडे' ही म्हण खोटी ठरली असती.

कांही म्हणींची गंमत अशी असते कीं, जर त्यांच्यावर विश्वास ठेवावयाचा नसेल तर त्यांच्यासारखी कौतुकास्पद दुसरी गोष्ट नाहीं. आंब्याच्या पाकळी-प्रमाणं त्या तोंडांत किती गोड वाटतात. किर्लोस्कर खुर्चीप्रमाणं दिसायला त्या कशा सुबक व सुटसुटीत असतात. पण व्यवहारात पाहिलं तर किर्लोस्कर खुर्चीइतकाहि त्यांचा उपयोग होण्याचा संभव नसतो. ‘ Sound mind in a sound body ’ ही म्हण खरी म्हणायची तर आखाड्यांतील पैलवानांच्या हातींच राजकीय सूत्रं द्यावीं लागलीं असतीं. पण पैलवान जितक्या जोरानं जोर काढतात त्याच्या शतांशहि त्यांच्या मनांत नसतो हें कुणाला सांगायला नको. जी स्थिति या म्हणीची, तीच बहुतेक इतर म्हणींची व तीच पाळ-ण्यांतल्या पायावरच्या म्हणीची ! जगांत जे जे धुरंधर, पराक्रमी, कीर्तिवान् पुरुष होऊन गेले त्यांचे पाय काय पाळण्यांत दिसले होते ? आणि तसंच जर पाहिलं तर बायरन कवीचे पाय पाहून—त्याचा एक पाय अधू होता—त्याच्या भावी कालाचं उज्ज्वल चित्र कुणीं रंगविलं असतं ? आज हिटलरचा परम दोस्त म्हणून जो समजला जातो तो डॉ. गोबेल्स काय पाळण्यात दोन धड पाय घेऊन बाळंत्यावर पडला होता ? लंगडत लंगडत रस्त्यातून कुबड्या घेऊन हें मूल भिक्षा मागत फिरेल एवढाच फार तर निष्कर्ष काढता आला असता. म्हणीप्रमाणं जगाचं चक्र चालतं तर स्वर्गाला पृथ्वीचा हेवा वाटूं लागला असता.

पण इतिहासाचा संदेश अगदीं निराळा व निर्दय असा आहे. लहान-पणीं मोठेपणींच्या जीविताची रचना कळावी इतकं सोपं मानवी जीवित नाहीं. जीविताचा मार्ग जर इतका साधासुधा असता तर त्यांतल्या पराक्रम, आनंद व रहस्यमयता यांचे रंग उडून गेले असते. पण जीवितांतलं हें काव्य नष्ट होऊं नये असाच त्याचा विचित्र क्रम आहे. लहानपणीं तीव्र बुद्धीचं ठरलेलं मूल एक नंबरचा अडाणी पुरुष झाल्याचीं उदाहरणं कांहीं

थोडींथोडकीं नाहींत ! तसेंच ज्यांना लहानपणीं टाकाऊ म्हणून ठरविलं होतं त्यांपैकीं कित्येकजण कीर्तीच्या धवल शिखरावर विराजत आहेत ! आज जगांत जे जे नामांकित शास्त्रज्ञ, कवि, संशोधक, तत्त्ववेत्ते, राजकारणी, योद्धे, कलावंत व कल्पक म्हणून झळकत आहेत त्यांपैकीं बहुतेकजण पाळण्यांतल्या पायाच्या न्यायानुसार हमाल, गवंडी, झाडूवाले ठरले असते. लहानपणीं शाळेंत शेवटच्या बाकावर बसून छड्यांचा प्रसाद खाणारे उडाणटप्पू विद्यार्थी पुढें थोर संशोधक व लेखक ठरलेले आहेत. क्षयी प्रकृतीची मुलं उत्तम पाहिलवान झालेलीं आहेत. ज्यांच्या वयाचीं पहिलीं वीस–पंचवीस वर्षे उनाडपणांत गेलीं तीं मुलंदेखील जगांत पुढं चमकलेलीं आहेत.

वयाच्या पंधरा–वीस वर्षेंपर्यंत कंगाल स्थितींत व्हिएन्नाच्या रस्त्यांतून भटकत पाट्या रंगविणारं एक पोर पुढें जर्मनीचा हुकुमशहा होईल असं कुणाला स्वप्नांत तरी वाटलं असतं ? अशक्त प्रकृतीचा व स्त्रैण मनोवृत्तीचा एक गुजराती मुलगा पुढं जनतेवर असामान्य जादू टाकणारा महात्मा होईल अशी कुणाला कल्पना सुचली असती ? तबेल्यांत घोडं धरून उभं राहणारं शेतकऱ्याचं अडाणी पोर शेवटीं जगांतील एक अद्वितीय नाटककार होईल असा विचार कुणाच्या मनांत आला असता ? वर्गांतील सर्वांत मठ्ठ म्हणून ठरलेला, कोंबडीप्रमाणं अंडें उबविण्याचा प्रयत्न करणारा व आगगाडींत छापखाना चालवीत असतांना मुस्कटांत खाणारा एडिसन पुढें अलौकिक संशोधक होईल याचा विचार तरी कुणाच्या मनांत आला असता ?

तीच गोष्ट मायकेल फॅरडेची ! लोहाराचा हा मुलगा वयाच्या तेराव्या वर्षी वर्तमानपत्र विकूं लागला व नंतर पुस्तकं बांधण्याचा धंदा करूं लागला. असा हा वर्तमानपत्रविक्या जगांतील एक अद्वितीय शास्त्रज्ञ होईल असं कुणाला स्वप्नांत तरी वाटलं असतं ? बेंजामिन फ्रँकलिनसारखा लहानपणीं

बापाला साबणाच्या धंद्यांत मदत करणारा व नंतर छापखाना उघडणारा मुलगा एक दिवस एक थोर राजकारणधुरंधर विद्वान् होईल याची कुणाला कल्पना होती ? इंग्लंडचा पहिला नामांकित कादंबरीकार हेन्री फील्डिंग यानं पन्नास वर्षे उलटल्यावर हातांत लेखणी घेतली. तत्पूर्वी 'टॉम जोन्स'चा हा कर्ता एक अजरामर कादंबरीकार होईल अशी कुणाला कल्पना सुचली होती ?

मानवी जीवित हें इतकं रहस्यमय आहे कीं, आयुष्यांतील कोणत्याही टप्प्यावर असतांना पुढल्या मार्गाची निश्चितपणानं खात्री देतां येणं सोपं नाहीं. कलकत्त्याच्या खिश्चन कॉलेजांतून बी. ए.पर्यंत शिक्षण घेतलेला व हर्बर्ट स्पेन्सरच्या ग्रंथवाचनानं निरीश्वरवादाकडे झुकलेला नरेन्द्र नाथ दत्त शेवटीं स्वामी विवेकानंद म्हणून जगप्रसिद्ध झालाच कीं नाहीं ? दहा वर्षे फायनान्स खात्यांत नोकरी करून बँक, विमा, अंदाजपत्रकं, कर्जरोखे यांची माहिती मिळविणारे चंद्रशेखर रमण शेवटीं थोर संशोधक बनले. उत्कृष्ट युरोपियन शिक्षण घेतलेले बाबू अरविंद घोष आज प्राणायाम व योग यांत गर्क झालेले आहेत ! पुष्कळ वेळां जीवनाचा प्रवाह संथपणें आणि सरळ मार्गानं चाललेला आहे असं आपणांस वाटत असतं व त्या आनंदांत आपण असतों. पण एकाएकीं नवीन घटना निर्माण होतात व अचानकपणें सर्व आयुष्याला विस्मयजनक कलाटणी मिळते. दारिद्र्यांत खितपत पडणाराला एकदम प्रसिद्धीचा मार्ग सांपडतो. निराश मनांत आशेचं चांदणं चमकूं लागतं. जीविताला कंटाळून आत्महत्येच्या कड्यावरून परतलेल्या लोकांनीं जगांत अलौकिक पराक्रम करून दाखविले आहेत. विलासांत लोळत पडणाऱ्या व्यसनाधीनांना पश्चात्ताप होऊन त्यांनीं वैभवत्याग करून संन्यासमार्ग पत्करलेला आहे व साधुत्वाचीं बिरुदं उतारवयापर्यंत मिरवून शेवटीं व्यसनांच्या डबक्यांत डुंबणाऱ्यांचीं उदाहरणं कांहीं थोडींथोडकीं नाहींत !

पाळण्यांत पाय दिसावे इतकी बाळबोध रचना जीविताची नाहीं. अनंत रहस्यमय घटनांनीं भरलेल्या या जीवनांत यशाचीं प्रसादचिन्हं अशीं सहजासहजीं ओळखतां येत नाहींत. अनुकूल वातावरण, समाधानकारक सांपत्तिक परिस्थिति यांमुळं पुष्कळशा कृत्रिम अडचणी टाळतां येतात हें खरं; पण खरं बावनकशी यश हें स्वतः पराक्रमांतूनच मिळत असतं. पुष्कळदा प्रतिकूल परिस्थितीनंच पराक्रमलालसेला कान्तीचा उजाळा दिलेला आपण नाहीं पाहात? सबंध आयुष्यभर आपण कसले तरी लहानमोठे प्रयोग करीत असतों. हे प्रयोग जो काळजीपूर्वक करील त्याला यशाची आशा जास्त! पण हे पराक्रम, भविष्यकालांतील ही यशःप्राप्ति बाळंत्यावर उपड्या पडलेल्या पोराकडे पाहून कशी अजमावितां येणार? नव्हे, ती अशी अजमावितां येत नाहीं यांतच जीविताची सर्व मौज सांठविलेली आहे; त्यांतच महत्त्वाकांक्षेचं बीज आहे; त्यांतच आपत्तींतून निर्माण होणाऱ्या आशावादाचीं मुळं आहेत व परिस्थितीवर विजय मिळविणाऱ्या निर्भय मनाचा तो खंबीर आधार आहे!

म्हणूनच मी म्हणतों कीं, या म्हणीचा अर्थ निष्कारण बदललेला दिसतो. पाळण्यांत पडलेल्या मुलाचे पाय पाहून फक्त तें लंगडं होईल कीं नाहीं एवढाच अंदाज बांधतां येईल. त्याच्या डोक्याचा अंदाज करण्यापूर्वी त्यानं पाळण्याबाहेर येऊन हिंडलं फिरलं पाहिजे! पाय म्हणजे डोकं नव्हे, हें काय स्पष्ट करून सांगायला पाहिजे थोडंच?

—( किर्लोस्कर )

# बैलगाडी १०

मला बिलकुल आनंद झाला नाहीं पत्राचा तो शेवट वाचून !

उन्हाळ्यांत आमच्या गांवीं चार दिवस पाहुणे म्हणून या असं सांगणारं एका कवि-मित्राचं तें पत्र होतं.त्यांत गांवच्या भोंवतालीं बहरलेल्या निसर्ग-सौन्दर्याचं रसाळ वर्णन केलेलं होतं; गांवची वस्ती ज्या टेकडीच्या पायथ्याशीं झालेली होती तिचं वेधकपणें वर्णन केलेलं होतं. विशेषतः काळ्या फत्तरांनीं भरलेल्या त्या टेकडीवर एकच निळसर रंगाची मोठी शिला कशी आहे व अरुणोदयाचे वेळीं पूर्वेचा तांबडा प्रकाश तिजवर पडला म्हणजे तिला एका निराळ्याच सौंन्दर्याची कशी खुलावट येते व या शिलेवर त्यानं कशीं तीन सुनीतं लिहिलीं आहेत याचाहि मोहक तपशील होता; गांवापासून दोन मैलांवर संथपणें वाहणारी नदी पोहण्याला कशी सोयिस्कर आहे व तिचं स्वच्छ व थंडगार पाणी किती बलवर्धक आहे; व तें प्राशन करतांच अन्तःकरणाला किती प्रसन्नता वाटते याचंहि विलोभनीय वर्णन होतं. याप्रमाणं

कोणत्याही रूक्ष मनाला मोह पडावा अशी निरनिराळया मोहक बाबींची पत्रांत गुंफण केल्यानंतर त्यानं शेवटीं म्हटलं होतं:--

" बरं आमच्या या खेडेगांवाला येण्याचा रस्ता अवघड किंवा खांच-खळग्यांनीं भरलेला आहे असंहि नाहीं. पूर्वी जेव्हां फक्त बैलगाड्यांची सोय असे त्यावेळीं कल्पनातीत त्रास होई. सगळीं हाडं खिळखिळीं होऊन जीव हैराण होऊन जाई. पण आतां! गांवापर्यंत स्वच्छ सुंदर दगडी सडक झाली आहे व हां हां म्हणतां अडीच तासांत मोटरबस आमचे घरासमोर येऊन उभी राहते! खेडेगांवाला जायचं म्हणजे बैलगाडीच्या यमयातना भोगायच्या हा न्याय आमच्या गांवाला लागूं होत नाहीं बर कां! तरी सुट्टीची संधि साधून जरूर याच अशी पुनः विनंति करतों!"

खेडेगांवाला जाण्याची कोणतीहि संधि सहसा दवडावयाची नाहीं असा माझा शिरस्ता आहे. आमच्या नोकरींत सुट्टयांची कमतरता नसते; नव्हे वर्षांतून सहा महिने मिळणारी सुट्टी कुठं व कशी घालवावी असाच प्रश्न आमच्यापैकीं पुष्कळांना पडत असला पाहिजे. मी मात्र सुट्टीचा मोका आला कीं कुठं जायचं व कसं जायचं याचा स्पष्ट आराखडा मनाशीं करून ठेवीत असतों. अर्थात् असा आराखडा तयार करतांना एखादं नवीन खेडेगांव शोधण्याचा माझा उद्योग चाललेला असतो. शहरच्या धांदलीला व गडबड घाईला त्रासलेलं मन खेडेगांवच्या शांततेंत जणूं पुनः संजीवित होतं; कसल्याना कसल्या धांवत्या वाहनांत बसून बसून आंबलेले पाय शेताच्या बांधावरून चालूं लागले म्हणजे गंजत चाललेलं शरिराचं यंत्र सुधारत चालल्याचा आनंददायक आभास होऊं लागतो. चित्रविचित्र रंगांनीं चितारलेलीं शहरी घरं पाहून विटलेलं मन हिरवीं हिरवीं शेतं पाहून व वाऱ्यामुळं त्या हलत्या शेतांचा सळसळाट ऐकून हर्षित होतं. ग्रामोफोनच्या खरखराटाला त्रासलेला

जीव एखाद्या झोंपडींतून पहांटच्या थंड वेळीं जात्यावर चालू असलेलं भोळं-भाबडं गाणं ऐकून अंतःकरणांत कसला तरी गारवा पसरावा असा आनंदानं भरून जातो. शहरच्या नळाचं कोमट बेचव पाणी पिऊन खराबलेली जीभ विहिरीचं थंड पाणी पिऊन जणूं लोभावून जाते. शहरचं तें काळसरवर्णी पातळ दूध! तें बेचव पिठाचं पाणी आतां जाऊन ताजं ताजं फेंसाळलेलं तेजाळ दूध नुसतं दृष्टीस पडतांच किती आल्हाद वाटतो! ताज्या दुधाची ती धारोष्णता! असल्या ताज्या गरम दुधाचा प्याला दोन्ही हातांत धरून त्याच्या नैसर्गिक उष्णतेचं सुख दोन्ही पंजांना देतांना जी मौज वाटते ती प्रत्यक्ष अनुभवाशिवाय कळायची नाहीं! रस्त्याच्या कडेला किंवा सार्वजनिक बागेंत टाकलेलीं बाकं व कुठं कुठं असणारे चिरेबंदी धक्के यांवर विश्रांति घेण्याची सक्ति जाऊन कुठंही माळावर भुसभुशीत मातींत बसावं, उगचच मातींत रेघोट्या ओढाव्या, पायांवर माती ओढून घ्यावी व समाधानानं विश्रांतिसुख अनुभवावं! असं सुखमय असतं खेडेगांवचं जीवन! पण त्याची खरी मौज लुटण्यासाठीं तुमचं मन शहराला विटलेलं, कंटाळलेलं असावयास पाहिजे!

—असा मी शहरी वातावरणाला विटून गेलों म्हणजे माझं मन अधीरपणें एखाद्या प्रसन्न खेडेगांवाची शोधाशोध करूं लागतं. अर्थातच कविमित्राचं तें आमंत्रण येतांच मला आनंद झाला. तेथल्या सृष्टिशोभेचं जें त्यानं वर्णन केलं होतं तें वाचून मी खूप झालों. विशेषतः पोहण्याची चांगली सोय आहे हें कळतांच मला अतिशय हर्ष झाला. कारण आदर्श खेडेगांवाला स्वच्छ व सुंदर वाहत्या नदीची संगत पाहिजे असं माझं ठाम मत आहे. तेव्हां या खेडेगांवीं नदी आहे हें कळतांच भावि आनंदाच्या भरांत मी हवेंत दोन चार हातहि फिरविले.

—पण शेवटीं बैलगाडीचा त्यानं केलेला उल्लेख !

तो वाचतांच माझं मन एकदम नाराज झालं; उल्हास किंचित् मंदावला व माझ्या तोंडून एकदम उद्गार बाहेर पडलाः

"च्! च्! तेवढी बैलगाडी असती तर! कोण बहार आली असती! तिची सर मोटरबसला थोडीच येणार आहे?"

बैलगाडी !

ओ हो ! किती मौजेची असते ती ! दोन चाकांवर चालणारा तो सांगाडा ! किती नयनमनोहर असतो तो ! चाकांच्या धुळींत चमकणाऱ्या लोखंडी धावा, लालसर मातींतून जात असतांना त्या चाकांना आलेला तांबूस वर्ण, गाडींतून जात असतांना चाकांना चिकटलेल्या मातीचा उन्मादक गंध, तेजदार, चपळ बैलांची नमुनेदार जोडी, त्या बैलांना गोंजारतांच त्या मुक्या जनावराला कल्पनातीत सुख होऊन कृतज्ञतेनं त्यानं वर केलेली मान, ती मान खाजवतांच आल्हाद होऊन लालसर जिभेनं त्यानं चाटलेला हात व त्यामुळं तोंडांतील फेंसाचा हातावर उडालेला पांढुरका शिडकावा, गाडी चालत असतांना त्यांच्या पुष्ट शरीरावरली हलणारी तेजस्वी, लठ्ठ, रुबाबदार वशिंडं, गळ्यांत घातलेल्या घंटांच्या नादावर लुब्ध होऊन त्यांची चालणारी कौतुकाची धांव,—व त्या नादानं खुषींत येऊन गाडीवानानं खड्या सुरांत म्हटलेलं गंमतीचं गाणं—

किती गंमती सांगाव्या बैलगाडीच्या?

—आणि त्याच्याच जोडीला गाडीच्या खालीं लोंबणाऱ्या छोट्या कंदिलाखालीं जर एखादं देखणं चपळ कुत्रं ठेकेदार पद्धतीनं आपली लाल जीभ बाहेर काढून गाडीचा वेग लक्षांत घेऊन धांवत असेल तर!—तर बैलगाडीसारखं सुखावह वाहन नाहीं दुसरं !

आजकालच्या यांत्रिक सुधारणेच्या युगांत प्रवाससुलभ अशा नवीन वाहनांचे शोध अनेक दृष्टीनं उपयुक्त ठरले आहेत, ही गोष्ट निर्विवाद असली तरी बैलगाडीची ' मौज ' त्यांत नाहीं हें मान्य करावयाला पाहिजे. शहरच्या डांबरी रस्त्यावरून धांवणारी मोटर मला आवडते; अहमदाबाद ते मुंबई असा प्रवास मला बैलगाडींतून झेपणार नाहीं हेंहि मी जाणतों. पण खेडेगांवची सहल करावयाची असेल तर बैलगाडी हेंच वाहन असावं असं मला कटाक्षानं म्हणावयाचं आहे. त्याशिवाय खेडेगांवची वनश्री, खेडुतांचा प्रेमळपणा, चंद्रप्रकाशाची आंघोळ, श्वापदांची अचानक भेट, बैलांच्या गळ्यांतील घंटांचा गंमतीचा नाद, गाडीवानाचं बैलांचं कौतुक करणारं खेडवळ पण जिवंत गाणं यांची मौज लुटतां यावयाची नाहीं ! चार चाकांवर दौडत जाणारी मोटरबस यादृष्ट्या अगदीं नालायक वाटते. तिच्यांतून जातांना आसपासच्या वनश्रीवर नजर तर ठरत नाहींच पण पेट्रोलची घाण, चाकाचा घरघराट व उतारूंचा वेंधळेपणा यांच्या यातना टाळतां टाळता जीव मेटाकुटीस येऊन जातो. आतां कधीं कधीं अंगावरील मळकट झग्यावर अनेक त्रिकोणी छोटे छोटे आरसे लटकावून आपली करमणूक करणारी एखादी वडार जातीची स्त्री बसमध्यें भेटते नाहीं असं नाहीं; पण तिचा आवाज ऐकतांच वंगण नीट न घातलेली बैलगाडी बरी अशी आपली स्थिति होऊन जाते.

निदान माझं तरी बैलगाडीइतकं दुसरं आवडतं वाहन नाहीं खास ! तिच्यांतून प्रवास करतांना मला कितीतरी मनोरंजक अनुभव आले आहेत; लहान वयांत पाठ केलेल्या काव्यांच्या ओळींचा अर्थ रात्रीचेवेळीं बैलगाडींतून प्रवास करतांना निसर्ग-शोभा नजरेस पडतांच मला आपोआप कळलेला आहे; जमिनीचा सुगंध किती उन्मादक असतो त्याचा अनुभव

घेतला आहे. सूर्योदयाची तांबुस किरणं दाट रानांत पाना पानांतून टिकल्या पडाव्या अशी अंगावर घेऊन पांढऱ्या शर्टावर निसर्गानं केलेली जाळीदार कलाबतू अनुभविली आहे. रानटी श्वापदांचा गुरगुराट कानीं पडतांच भीतीनं दडपलेल्या मनःस्थितींतहि अष्टमीच्या चंद्राच्या दुग्धधवल किरणांना जणूं खाण्यासाठीं तोंड उघडं करून तीं किरणं तोंडांत घेतलीं आहेत; पहांटच्या थंड वेळीं चालण्याची हुक्की येऊन गाडींतून उतरून चालतां चालतां रस्त्यावर आडव्या पडलेल्या सर्पावर पाय पडतांच त्याच्या रागीट शेपटीचा तडाखा पायावर घेतलेला आहे—

असे एक ना दोन !

कितीतरी विचित्र अनुभवांची प्राप्ति बैलगाडीच्या संगतीमुळं मला झालेली आहे !

मला आठवतं. आमच्या घरांत पूर्वीपासून सर्वांना काव्याची गोडी. त्यामुळं कवितांचीं पुस्तकं खूप पडलेलीं असायचीं. अर्थ न कळतां तांबे, टिळक, ठोंबरे, रेंदाळकर, गडकरी इत्यादींच्या कितीतरी कविता आम्हांला तोंडपाठ येत. दरवर्षी उन्हाळ्यांत पुण्यास शाळा बंद झाल्या कीं आम्ही चार पांच जण बैलगाडींतून गावीं जावयास निघत असूं. भोर संस्थानांत मुठा नदीच्या काठीं वसलेल्या त्या कोंडूर गांवाला जावयाचा रस्ता अडीअडचणीचा, खांचखळग्याचा, रानावनांतून असा असे. मधेंच एक खिंड लागे व ती ओलांडतां ओलांडता गाडी केव्हां डोंगरावरून कोसळेल याची भीति वाटून आम्ही अंग आकसून बसत असूं. आम्हांला नेण्यासाठीं घरचीं गाडी येत असे व गाडीचे बैल पुष्ट व ताकदवान असल्यामुळं प्रवास करायला मौज येई. आमचा घरचा गाडीवान् भिवादेखील मोठा गमत्या होता. तो आम्हांला भुताखेतांच्या व खून-दरवड्याच्या गोष्टी सांगून भेदरवी व लगेंच

एखादं गाणं म्हणून अगर कुत्र्या–मांजरासारखा आवाज करून हंसवी! गाडी रात्रभर वाट चाले तेव्हां कुठं सकाळीं अकरा वाजतां आम्ही घरीं पोंचत असूं. गाडी अशी चालत असली म्हणजे भोंवतालचा देखावा पाहतांच आम्हांला आपोआप पाठ केलेल्या काव्याच्या ओळी सुचत व तो देखावा पाहतांच त्या ओळींचा एकाएकीं अर्थ कळून मनाला विलक्षण आनंद होई. प्रवास चालूं असतांना एकदां गाडी खिंड चढून वर आली त्यावेळीं खालील निळ्या रंगाच्या दऱ्या पाहून आमच्यापैकीं कुणीतरी सहजच गुणगुणलं:

**प्रीति ना वसे कधींहि उन्च त्या गडावरी,**
**उतर उतर ये–प्रीति हवि तरी!**
**रुचति खालच्याचि तिला मोकळ्या निळ्या दरी!**

व त्यानं खालच्या निळसर दरीकडे बोट दाखविलं.

त्यांवर आम्ही सर्वजण मनःपूर्वक हंसलों.

इतक्यांत कुणीं तरी विचारलं:

'प्रीति म्हणजे काय रे?'

सर्वांनीं एकमेकांकडे बघितलं. कुणालाच सांगतां येईना. शेवटीं भिवाला विचारावं असं सर्वांनीं ठरविलं व त्याप्रमाणं त्याला विचारतांच तो हंसत हंसत म्हणाला:—

'पीर्ती व्हय! तुमास्नी न्हाई समजायची ती!'

"अरे पीर्ति नव्हे प्रीति!!" आम्ही गलगलाट केला.

त्यावर मान डोलावीत तो पुनः म्हणाला,

'हां हां समजलं! पीर्ति पीर्ति! पीर्ति म्हणजे पघा...' व तो विचार करूं लागला व शेवटीं नकारात्मक मान हलवीत म्हणाला,—

‘ तें सांगतां न्हाई यायचं ! पन् पीर्ति काय तें मला ह्य म्हाहीत !’ व तो मनाशीं हंसला, व खुषीत आल्यासारखा गाणं गुणगुणूं लागला.

त्या गोष्टीला वीस-बावीस वर्षे होऊन गेलीं. पण तो प्रसंग मला ठळक-पणें आठवत आहे ! जिवाचे त्यावेळीं नीट न समजलेले शब्द किती मार्मिक होते त्याची आतां कल्पना येते !

प्रीति !

खरंच ! काय बरं प्रीति म्हणजे ?

ती काय तें अन्तःकरणाला कळतं पण शब्दांतून उमटत नाहीं हेंच खरं नाहीं ?

एकदां तहान लागली म्हणून आमची गाडी आम्हीं एका झऱ्याजवळ उभी केली व सर्वजण आनंदानं पाण्यांत पाय बुडवून बसलों. खडकावरून आलेलं झऱ्याचं पाणी आमच्या पायाभोंवतीं गरगरत होतं. अगदीं सहजच माझ्या बहिणीच्या तोंडून शब्द निघाले,

**घे लोळण खडकावरती । फिर गरगर अंगाभंवतीं !**

त्यावर मी हंसत म्हणालों,

**पाचूचीं हिरवीं रानें । फुलव गडे झुळुझुळु गानें !**

व विचारलं,

काय ग ताई, पाचू म्हणजे काय ?

पाचू ! पुन्हां सर्वांना अडचण आली ! त्यावर माझी बहीण म्हणाली,

“ इश्श ! असल्या कसल्या या कविता ! त्यांतल्या शब्दांचा अर्थही कळत नाहीं ! जिचा अर्थ कळत नाहीं ती कविता कसली ! ” व ‘पाचू’ शब्दाबद्दल तक्रार करीत आम्हीं सर्वांनीं त्या निषेधांत भाग घेतला; यानंतर पांचच मिनिटांनीं आमच्या डोक्यावरून पक्षांची पांगलेली रांगची रांग

किलबिलाट करीत आपले शुभ्र पंख फडफडावीत निघून गेली व ताईच्या तोंडून सहजच शब्द निघाले,

**नवीं नवीं येती । पांखरें नवी नवी येती ।**
**हीं फुलें उधळिलीं कुणीं नभांतुन जणुं वाऱ्यावरतीं !**

व पाखरांची फुलांबरोबर केलेली तुलना आम्हांला इतकी आल्हाददायक वाटली कीं, हर्षभरानं आम्हीं टाळया पिटल्या व घोळून घोळून त्या ओळी म्हटल्या.

रात्रीची शांतपणें गाडी चालली असतांना आकाश चांदण्यांनीं फुललेलं पाहून तर आम्हीं किती निरनिराळीं कडवीं म्हटलीं असतील त्यांची गणतीच नाहीं. बालकवींचं **तारकांचें गाणें** तर आम्ही सगळेजण मिळून प्रत्येक सुट्टींतल्या प्रवासांत म्हणत असूं. पहांटच्या वेळीं आकाशांत एकच चांदणी लुकलुकतांना पाहून एकदां जें आमचं संभाषण झालं तें आतां किती उद्बोधक वाटतं ! मी वर पाहत गुणगुणलों,

**ये पहांटचा वर तारा**
**शेवटचा देत पहारा !**

त्यावर माझ्या बहिणीनं आनंदानं टाळी वाजवून म्हटलं,

‘ कित्ती कित्ती छान ओळी आहेत नाहीं ? ’ व लगेच गंभीर बनून तिनं विचारलं,

‘ काय रे भाऊ, म्हणजे कवितेंत जें लिहिलेलं असतं तें सगळं खरं असतं तर ! मास्तर तर म्हणत होते ’—

‘वा ग वेडे ! आपल्यासारखंच पहांटेचा प्रवास करतांना कवीनं हा असला तारा पाहिला असेल म्हणून तर त्यांनीं ही कविता केली असावी. चांगले कवि खोटं लिहीत नाहींत ! ! मास्तरांचं म्हणणं मला नाहीं खरं वाटत.’

"खरंच ! खरंच ! ! असंच असलं पाहिजे ! खोट्या कवितांचा उपयोग तरी काय ? भाऊ, आपल्याला येतील कां रे कविता करतां ?"

त्यावर मीं काय उत्तर दिलं तें आठवत नाहीं ! पण तांब्यांच्या त्या दोन ओळींची त्या वेळेपासून माझ्या मनावर जी जादूची पकड बसली आहे ती अजूनही कायम आहे ! वीस वर्षांनंतर कविश्रेष्ठांच्या त्या ओळी आठवल्या म्हणजे पहांटच्या शांत वेळीं फिकट निळसर आकाशांत शांतपणें जाग्यावर एकनिष्ठपणें पाहारा करणारा तो तारा आठवतो व अन्तःकरणांत आनंदाचा कल्लोळ उसळतो !

गाडी रात्रभर चालल्यामुळं बैल थकून गेलेले असत; आम्हीही गप्पा मारून मारून दमल्यामुळं झोपीं जात असूं अशा वेळीं एकाएकीं दिवस उजडे व मग ताईनं मंजुळ स्वरांत गाणं म्हणावं—

**उघडिं नयन ! रम्य उषा हंसत हंसत आली !**

व ताईच्या गोड गळयांतून बाहेर पडलेल्या त्या गानलहरी आम्हांला निद्रेच्या रेशमी बाहुपाशांतून जाग्या करीत. आम्हीं उठून बसावं तो खरोखरच समोर पूर्वेच्या बाजूला कुणी हंसत आहे असा भास होई व कधीं नीट अर्थ समजून न घेतलेली ती ओळ एकाएकीं अर्थानं भरलेली पाहून आश्चर्य वाटे ! हर्षित होऊन घोळून घोळून रेन्दाळकरांची ती म्हटलेली ओळ अजूनही जादूच्या लुकलुकणाऱ्या ज्वाळेसारखी वाटते मला.

मॅट्रिकच्या वर्गात असतांना मी एकटा बैलगाडींतून गांवीं चाललों होतों, व पहांटच्या रम्य वेळीं अंगावरून थंड वाऱ्याची झुळूक जातांच, मला आठवतं, मनांत एकदम प्रसन्नता झळकली व—

**अजुनि लागलेंचि दार, उजळे ही प्राची**
**स्वच्छ थंडगार झुळुक वाहतसे ताजी !**

या ओळी आठवून थंडगार झुळुकेचा प्रत्यक्ष अनुभव शरिराला मिळाल्यामुळं तांब्यांच्या समर्पक शब्दयोजनेबद्दल मनांत जो कौतुकाचा व विस्मयाचा तरंग उसळला त्याची उत्कटता अजूनही मंदावलेली नाहीं. याप्रमाणं बैलगाडीच्या प्रवासामुळं जी माझी काव्यावर भक्ति बसली तिनं मला आयुष्यांत निराशाजनक प्रसंगीं केवढ्या तरी आनंदाची सांवली उभी करून मनाचा हिरवेगारपणा तगवून ठेवलेला आहे !

बैलगाडींतून जातांना निसर्ग-शोभेचीं केवळ चित्रं आपण पाहत नाहीं, तर त्याची खरीखुरी संगति आपल्याला लाभते व त्या शोभेची कोंवळी छाया जणूं मनावर पसरते. बैलगाडीमुळंच मला एकदां निसर्गाच्या राज्यांत किती विविधरंगी आश्चर्यें आहेत, केवढी सौन्दर्याची संपत्ति ओसंडून राहिली आहे याची कल्पना आली. गांवीं बरेच दिवसांत गेलों नव्हतों म्हणून मी दोन वर्षांपूर्वी बैलगाडीनं शेतवाडीकडे एकदा नजर टाकून यावी म्हणून चाललों होतों. मध्यरात्र उलटून गेल्यानंतर थंड हवेच्या लहरी येऊं लागल्या. चांदणं पिठासारखं शुभ्र पडलेलं होतं व सर्व सृष्टि दुधांत बुचकळून काढावी अशी दिसत होती. गाडीचा तट्टया काढून मी आडवा होऊन आकाशांतील चांदण्यांची शोभा पाहत होतों. पाहतां पाहतां मला केव्हां डोळा लागला तें कळलं नाहीं——

मी जागा झालों तो कसला तरी प्रमत्त सुगंधाचा घमघमाट नाकांत शिरल्यामुळं ! जागा होऊन पाहतों तों मी कसल्या तरी नवीनच फळा-पुष्पांनीं बहरलेल्या एका मळ्याजवळ आलों होतों. क्षणभर मी इकडे कसा आलों त्याचा उमज पडेना तोंच गाडीवानाचं घोरणं ऐकून सर्व उमज पडला.

माझ्याप्रमाणंच थंड वाऱ्यांत गाडीवान झोपी गेला होता; नेहमींचा रस्ता सोडून बैलांनीं भलत्याच मार्गानं निघून गाडी इकडे कुणीकडे आणून उभी केली होती !

पण कोण जादुमय वनश्रीनं भरलेलं ठिकाण होतं तें! मी गाडींतून उतरून विस्मयानं भोंवतीं नजर टाकली. माझ्या भोंवतीं पुष्पांचं व रसदार फळांचं जणूं संमेलन भरलेलं होतं. आकाशांतून चांदीचा रस ओघळत होता व त्या पिठोरी चांदण्यांत फुलांचे ताटवे तारुण्यानं फुलून निघालेल्या किशोरीप्रमाणं उभे होते. क्षणभर माझा नजरेवर विश्वासच बसेना. 'मी स्वप्नांत तर नाहीं?' असा विभ्रमही क्षणभर मनाला वाटला. इतकं रमणीय स्थळ मावळ प्रांतांत कुठं असेल याची कल्पनादेखील मला नव्हती. फुलांचा घमघमाट इतका विलक्षण सुटलेला होता कीं, त्यामुळं श्वासोच्छ्वास-देखील कष्टानं होतो आहे असं वाटे. याप्रमाणं त्या फुलांच्या राज्यांत मी किती वेळ वेड्यासारखा उभा राहिलों असतों कुणास ठाऊक! पण इतक्यांत माझ्या समोरून एक पुष्टदेही सर्प सळसळत डाव्या हाताच्या ताटव्यांत निघून गेला व भीतीनं मीं गाडींत चटकन् चढून गाडिवानाला जागं केलं व मैल दीड मैल परत फिरल्यानंतर आमची गाडी नेहमींच्या मार्गाला लागली.

पण त्या अनुभवानं मला एक धडा शिकविला. जर निसर्गाच्या राज्यां-तलीं आश्चर्यं अवलोकावयाचीं असतील तर तसा निश्चय करून माणसानं त्या मार्गाला लागलं पाहिजे. निसर्ग स्वभावानं बेफिकीर आहे, व जर तुम्हीं त्याची भेट घ्यायची नाहीं असं ठरविलं तर तुमची पर्वा करणार नाहीं, हाच तो धडा! हा धडा मला बैलगाडीनं शिकविला असं नाहीं म्हणतां येणार?

नवीन यांत्रिक उपकरणं पाहून मनावर जितका परिणाम होत नाहीं इतका साध्यासुध्या पूर्वीच्या ओबडधोबड गोष्टी पाहून होतो. विहिरीवर चाल-लेली मोट, मुलाला पाजीत बसलेली माता, तीन दगडाच्या रस्त्याच्या कांठच्या चुलींतून निघणारा लाल जाळ, शेतांतील लांकडी औत, विहिरीजवळ पाणी भरण्यासाठीं जमलेल्या स्त्रिया व गळ्यांतल्या घंटांचा नाद करीत बैलांनीं

चालविलेली गाडी पाहून मनावर जो विचित्र व अनिर्वचनीय परिणाम होतो तो सार्वजनिक नळावरील गर्दी अगर सुबक मोटरींचा थवा पाहून होत नाहीं. कारण या ओबडधोबड उपकरणांत अन्तर्यामाला स्पर्श करण्याची कसली तरी शब्दातीत शक्ति आहे. ग्रामोफोनवर ऐकलेलं गाणं व पहांटच्या जात्यावरून आलेली गाण्याची शांत लकेर यांचा मनावर होणारा परिणाम किती तरी निराळा असतो! याचं कारण एकच असावं. ज्या गोष्टी मनुष्य-जातीनं जीवनास आत्यंतिक उपयुक्त म्हणून निर्माण केल्या त्यांचं दर्शन घडतांच सुधारणेच्या लाटेंत वाहत जाऊन आपण उगचच कसा मृगजळाचा पाठलाग करीत आहोंत याची अंशतः जाणीव होत असावी! तीच गोष्ट बैलगाडीची व इतर आधुनिक वाहनांची! वास्तविक कोरी करकरीत बन-विलेली सुबक मोटरगाडी किती नयनमनोहर असते! पण बैलगाडी दृष्टीस पडतांच अन्तःकरणावर जो एक निराळाच परिणाम होतो तो ती टसकेदार मोटरगाडी पाहून होत नाहीं! मानवानं आपल्यासाठीं ज्या अत्यावश्यक गोष्टी निर्माण केल्या त्यांत भोळ्या भाबड्या बैलगाडीचा प्रामुख्यानं उल्लेख करतां येईल. शेतांतील औत, विहिरीवर रांजण भरणारी, अगर अर्भकाला पाजणारी स्त्री व बैलगाडी यांचं दर्शन आपणांस गूढ व परिणामकारक वाटतं याचं कारण तीं दृश्यं आपणांला आपल्या मानवतेची ठळक जाणीव करून देतात म्हणून! जगांत सगळीकडे तीं दृष्टीस पडतील, कारण तीं जीवनास अतिशय जरूरीची म्हणून अविनाशी आहेत.

आजच्या यंत्रनिष्ठ युगांत निरनिराळ्या वाहनांचे शोध इतक्या जलदीनं लागत आहेत कीं, आज उपयुक्त ठरलेलं वाहन उद्यां निकामी व नीरस ठरून मागं फेंकलं जात आहे. बैलगाडीला दूर ढकलणारा टांगा निघाला तोंच सायकलनं त्याचा गर्व परिहार केला. सायकल कुठं वेगानं धांवूं लागली

तोंच मोटरीची दौड सुरू झाली व सायकलीला हिरमुसलं बसावं लागलं. मोटरीच्या नाकावर टिच्चून विमानं आलीं व यानंतर कुणीं सांगावं केवळ पायांत एखादी यांत्रिक वहाण घालून माणसाला जमिनीप्रमाणं हवेंतूनही मौजेनं व ऐटीत चालतां येईल. जगाची धांव अशी जलदीनं चालली असतांना बिचाऱ्या बैलगाडीचा त्यापुढं काय टिकाव लागणार! हळूं हळूं खेड्यापाड्यांतून मोटरींचं जाळं पसरून कांहीं कालानंतर तिचं दर्शनही दुर्लभ होईल कीं काय अशी भीति कधीं कधीं वाटते! पण ज्या यांत्रिक सुधारणेंत बैलगाडीला अर्धचन्द्र मिळेल तिचं स्वरूप नेहमींच नकली व अपुरं राहणार! निसर्गसौन्दर्याचं अंतःकरण खुलं करणारं जर कोणतं वाहन असेल तर ती बैलगाडीच होय! दोन बेढब चाकांवर कसाबसा हलणारा तो लांकडी सांगाडा! पण एकदां तुम्ही त्यांतून रात्रीचा व सकाळ संध्याकाळचा एक आठवडा प्रवास करा! निसर्गाबद्दल तुम्हांला एक निराळीच दृष्टि लाभल्याचा आनंद झाल्याशिवाय राहणार नाहीं! निदान निसर्गाबद्दल ज्या अंधुक कल्पना मनांत वावरत असतात त्यांना समजुतीचा उजाळा मिळाल्याचा आल्हाद मनाला होईल.

बैलगाडीची तरफदारी करतांना स्वदेशीचं प्रेम उसळून मला यांत्रिक सुधारणेचा भोळेपणानं निषेध करावयाचा नाहीं; पण ज्या वाहनानं निसर्गसौन्दर्याबद्दल आपली दृष्टि निवळते त्या वाहनाची कितीहि प्रशंसा केली तरी अपुरीच पडेल नाहीं का? माझ्या प्रिय कविमित्रांनीं कौतुकानं मला आमंत्रण दिलं खरं!——पण ते कवि असूनहि बैलगाडीचा काव्याशीं व जीवनाशीं असलेला जिव्हाळ्याचा संबंध त्यांना कळलेला नाहीं खास!

——नाहींतर त्यांनीं पत्रांतला तो शेवटला मजकूर लिहिला नसता!

अहमदाबाद
डिसेंबर १९४०.

# दंतकथा	११

आज जवळजवळ अठरा वर्षांनीं परत शाळेंत पाऊल टाकतांना माझ्या अंतःकरणांत विविध भावनांचा कोण कल्लोळ उसळला !

ज्या शाळेंत आपण खेळलों, बागडलों, लहानमोठ्या खेळांत भाग घेऊन आनंदांत काल घालविला, त्या शाळेंत परत येतांना मनाची होणारी विचित्र स्थिति कुणीं अनुभविली नसेल ? ज्या जागेंत बालवयांत अनेक तऱ्हेच्या गंमती केल्या व अनुभविल्या त्यांची आठवण होतांच मन क्षणैक प्रौढपणाचं ओझं विसरून पूर्वीच्या सुखकर स्मृतींत गुंग होतं. शाळेच्या बाकावर खोदलेलं आपलं नांव पुनः नजरेला पडतांच मनाची जी स्थिति होते तिचं वर्णन पूर्णपणें करण्यास शब्दही अपुरे पडतात असंच नाहीं कां वाटत ?

त्या दिवशीं माझीही अशीच स्थिति झाली. मी आतां लेखक झालों म्हणून कीं काय मला शाळा पाहावयास बोलविण्यांत आलं होतं. आणि जेव्हां

अधीरपणेंच तें आमंत्रण स्वीकारून मी शाळेच्या कंपौंडांत पाय टाकला त्यावेळीं माझ्याही मनांत विविध भावनांचं वादळ उसळलं.

याच शाळेंत मी इंग्रजी मुळाक्षराशीं परिचय करून घेऊन इंग्रजी चौथ्या इयत्तेपर्यंत शिक्षण घेतलं होतं. शाळेचा पहिला मजला बांधला जात असतांना खालीं पसरलेल्या वाळूंत पाय न मोडतां उडी मारण्याच्या शर्यती जिंकल्या होत्या. तास लवकर सुटावा म्हणून घंटी वाजविल्यामुळं पकडलं जाऊन हेडमास्तरांच्या हातच्या दोन अविस्मरणीय अशा छड्याहि खाल्ल्या होत्या.

—आणि मौज अशी कीं, मला असा छड्याचा प्रसाद देणारेच हेडमास्तर सन्मानपूर्वक मला बोलावून माझं स्वागत करीत होते. या १८ वर्षांच्या अवधींत शाळेंत केवढा तरी विस्मयकारक फरक झालेला होता! शाळेचा भिवा गडी खोकत खोकत समोर आलेला पाहून मला त्याची १८ वर्षांपूर्वीची मूर्ति आठवली. एकेकाळीं हनुमानाप्रमाणं वीरश्रीनं पावलं टाकीत आपल्या शारीरिक सामर्थ्याची जाणीव असल्यामुळं कीं काय सदैव हंसतमुख असलेला हा बलवान् गडी आतां कालांतरानं जर्जरीत होऊन पाठीला बांक आलेल्या स्थितींत कसाबसा दोन पायांच्या आधारावर आपली नोकरी रेटीत होता. आणि त्याची तान्ही मुलगी भिमा!— मला आठवतं ती जन्माला आली त्यावेळीं आम्ही भिवाच्याभोंवतीं गोंगाट करून त्यांज-कडून एक रुपयाच्या रेवड्या उकळल्या होत्या. जिच्या जन्मामुळं आमचं तोंड असं गोड झालं त्या भिमाबद्दल आम्हांला नेहमींच कौतुक वाटे. कधींकधीं बाळंत्यावर पडलेली ती मुलगी आम्ही दाराजवळ जाऊन बघत असूं! पण ती तान्हेली मुलगी आतां भर तारुण्यांत येऊन सौंदर्यानं नुसती मुसमुसलेली होती. भिवा आणि त्याची मुलगी यांना अर्थातच माझी ओळख

नसावी; पण मीं मात्र शाळेच्या कंपौंडाच्या आंतल्या त्याच्या खोलीकडे व दारांत उभ्या असलेल्या भिमाकडे नजर टाकली त्यावेळीं मला बाळ-पणींची ती सर्व हकीगत आठवली.

हेडमास्तरांच्या बरोबर मी वर्गावर्गावरून जात असतांना ओळखीचे असे कितीतरी पूर्वीचे शिक्षक मला दिसले. ज्या शिक्षकांच्या हातांखालीं लिहावाचायला शिकलों त्यांनीं नम्रपणें केलेले प्रणाम स्वीकारतांना मला कमसंच वाटलं. आपण जगांत कितीही मोठेपण मिळविलं तरी बालवयांतील शिक्षकांसमोर नेहमींच आपणांला अजाण बालकाप्रमाणं वाटत असतं. आईपुढं मुलगा कधीं मोठा असतो कां? बालवयांतील माझ्या परमपूज्य शिक्षकाचा प्रणाम स्वीकारतांना माझ्या जागृत झालेल्या बालवृत्तीला गोंध-ळल्यासारखं झालं. मी एका वर्गाबाहेर उभा राहून हेडमास्तरांशीं बोलत होतों इतक्यांत मला परिचित असा आवाज त्या वर्गांतून माझ्या कानीं पडला.

कुतूहलानं मीं खिडकींतून पाहिलं. माझे इतिहासाचे शिक्षक भानु हे कांहींतरी शिकविण्यांत मनस्वी गर्क झालेले माझ्या दृष्टीस पडले. मला खूप मौज वाटली. एक तर भानुमास्तर आपल्या वक्तृत्वामुळं आम्हां विद्या-र्थ्यांचे फार आवडते असत. ते इतिहास शिकवूं लागले कीं सर्व वर्गांत चैतन्याचं वारं पसरे. अठरा वर्षांत त्यांच्यांत मला विशेष असा फरक झालेला दिसला नाहीं. मात्र डोळ्यांवर आतां चष्मा आला होता.

अधिकच कौतुकानं मीं त्यांच्याकडे पाहिलं. मुरारबाजीवरील धडा ते शिकवित होते. शांत गंभीर मुद्रेनं वर्गाकडे बघत त्यांनीं उद्गारलेले शब्द मला स्पष्ट ऐकूं आले:

"तेव्हां मुद्दा असा कीं, आतां दंतकथांवर आपण आंधळा विश्वास ठेवतां कामा नये. शुद्ध शास्त्रीय दृष्टींतून आतां आपण आपल्या इतिहासाची

चांचणी घेण्यास शिकलं पाहिजे. आपण आतां शास्त्रीय युगांत राहत आहोंत. बुद्धिवादाचे हे दिवस आहेत. जें बुद्धीला पटणार नाहीं त्याजवर विश्वास ठेवण्याची वृत्ति आतां उपयोगी नाहीं. मुरारबाजीच्या मृत्यूचं इतिहासकारांनीं केलेलं हें वर्णनच पाहा. म्हणे शीर धडावेगळं झालं असतांनाही त्यानं तीनचारशे शत्रूंचा नाश केला. ही गोष्ट तुमच्या बुद्धीला पटते कां ? शीर नसलेलं धड लढूं शकेल ही कल्पना हास्यास्पद नाहीं ? आजकालच्या शास्त्रीय युगांत असल्या खुळचट दंतकथा कशा पटाव्या ? तेव्हां मला तुम्हांला असं कटाक्षानं बजवावयाचं आहे कीं, दंतकथांवर विश्वास ठेवूं नका व शास्त्रीय चष्म्यांतून आपल्या इतिहासाकडे पाहावयास शिका.'' व त्यांनीं शास्त्रीय चष्मा म्हणजे काय हें दाखविण्यासाठीं कीं काय नाकावरला आपला चष्मा हलवून नीट बसविला.

शाळेचा निरोप घेऊन मी बाहेर पडलों तरी भानुमास्तरांचे शब्द माझ्या मनांत घोळत होते. मला बरंच आश्चर्य वाटलं त्या शब्दांचं ! १८ वर्षांपूर्वींचा मला असाच एक प्रसंग आठवला. भानुमास्तर मराठ्यांची थोरवी आम्हांला पटवून देत होते. मराठ्यांचीं वीरकृत्यं सांगत असतांना त्यांच्या वाणीला नेहमींच तेज चढे. मराठ्यांचं शौर्य वर्णितांना ते विलक्षण भावनावश होऊन बोलत. ते असे अतिशय अभिमानानं व उत्साहानं बोलूं लागले कीं त्यांचा गोरापान चेहरा तांबडालाल होई, मस्तकाची उजवी शीर उडूं लागे व उत्साह अनावर होऊन कधींकधीं हात जोरानं टेबलावर आपटून ते मोठ्यानं ओरडावं अशा आवाजांत बोलूं लागत. असंच एकदां मराठ्यांची वीरश्री सांगतांना त्यांनीं उत्साहानं तळपत असतांना उद्गारलेले शब्द मला आठवले. मुद्रा तांबडीलाल झाली असतांना आवेशानं टेबलावर मूठ आपटीत भानुमास्तर उद्गारले होते, “ कोण म्हणतो मराठे

शूर नाहींत म्हणून? कोण म्हणतो त्यांच्या अंगांत वीराचं रक्त नाहीं म्हणून? जगाच्या इतिहासांत अमर ठरावी अशीच मराठ्यांची वैभवशाली वीरकृत्यं आहेत. इतकंच नव्हे तर त्यांचे कांहीं पराक्रम अभूतपूर्व असे आहेत. एकच गोष्ट सांगतो. वीरश्रेष्ठ मुरारबाजीची गोष्ट घ्या. राष्ट्रासाठीं लढत असतांना प्रत्यक्ष शीर धडावेगळं झालं. अंगांतून रक्ताचीं कारंजीं उडूं लागलीं, लढतां लढतां अंगावरील वस्त्रांच्या चिंध्या झाल्या तरी या वीरमणीचा हात लढतच होता. शेवटीं, तीनचारशें मुसलमानांना यमसदनाला पाठविल्यानंतर दमलेला हात लुळा पडला व विश्रांतीसाठीं देहानं जमिनीचा आश्रय घेतला. शीर धडावेगळं झालं असतांना इतकी अपूर्व वीरश्री दाखविणारा वीर जगाच्या इतिहासांत तरी कोणी छातीठोकपणें दाखवूं शकेल काय?"

अभिमानाच्या भरांत मास्तर चटकन् उठून उभे राहिले. त्यांचे ते जळजळीत शब्द आम्हांला विजेच्या लोळाप्रमाणं भासले व सर्व वर्गांतून एक प्रकारचं चैतन्याचं वारं शिरशिरलं. दचकून आम्ही एकमेकांकडे पाहिलं व चकित होऊन मास्तरांच्या तेजःपुंज चेहऱ्याकडे आम्ही वेड्यासारखें कितीतरी वेळ बघत राहिलो.

घरीं जातां जातां मला मास्तरांचे ते अठरा वर्षांपूर्वीचं उकळत्या अभिमानाने भरलेले शब्द आठवले व माझ्या मनांत विचार आलाः कांहीं काळापूर्वी भावनेने रसरसलेले भानुमास्तर असे थंड वृत्तीचे कसे झाले? हा बदल त्यांच्यांत कसा घडून आला? व वाटलं, मास्तरांच्यांत हा बदल इष्टच नव्हे कां? बुद्धिवादाचं आजचं जग! शास्त्रीय ज्ञानाचा ज्या युगांत गौरव होत आहे त्याला अनुसरूनच मास्तरांच्या वृत्तींतला हा फरक

झालेला नाहीं कां ? परंपरेची पूजा करण्याचे हे दिवस नव्हेत. आंधळी भक्ति आतां चालणार नाहीं. रूढीवर भिस्त ठेवून निर्धास्तपणें फिरण्याचे हे दिवस नाहींत. माणसानं बंडखोर बनून जुन्या कल्पनांच्या मूर्ति आतां फोडल्या पाहिजेत. भावनेपेक्षां बुद्धीलाच मान मिळणं आतां योग्य आहे. बुद्धिवाद हाच खरा मित्र समजून आपला जीवितप्रवास केला पाहिजे. मास्तरांनीं म्हटलं तें कांहीं खोटं नाहीं. आतां शास्त्रीय चष्म्यांतूनच गतेतिहास, समाज व जीवन यांची पाहणी आपण करण्यास शिकलं पाहिजे. १८ वर्षांत मास्तरांच्यांत कांहीं बदल झाला नाहीं असं आपल्याला वाटलं. पण त्यांचा तो चष्मा !— खास कांचेचा चष्मा नव्हे तो ! शास्त्रीयतेचा चष्मा असून त्याला बुद्धिवादाचीं भिंगं आहेत. बुद्धिवादाचा पुरस्कार केल्याशिवाय आमच्या राष्ट्रीय जीवनाची विस्कटलेली घडी नीट होणार नाहीं.

याप्रमाणं विचार मनांत तरंगत असतांना मी घरीं आलों. तों ताज्या पोस्टानं आलेलं एक भलं भक्कम पुस्तक माझ्या हातांत पडलं. केव्हांतरी पैसे भरून मी कलकत्त्याकडच्या एका प्रकाशन-संस्थेचा सभासद झालों होतों. कंपनीकडून मधूनमधून निवडक प्रकाशनं सभासदांकडे पाठविलीं जात. प्रस्तुतचं पुस्तक त्यांपैकींच एक होतं. अधीरतेनं मीं तें उघडून पाहिलं. 'शास्त्रीय चमत्कार' या नांवाचा तो एक मोहक बांधणीचा व पुष्ट देहाचा ग्रंथ होता.

माझ्या पदरीं असलेलीं सर्वच पुस्तकं संपूर्णतया वाचण्याची मला संवय नाहीं. कांहीं कांहीं पुस्तकं केवळ चार पानं चाळून मीं ठेवून दिलेलीं आहेत. नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणं मीं आजचं नवीन पुस्तक चाळून पाहिलं. आणि चमत्कार असा कीं, मी त्यांतला मजकूर वाचतांच त्यांत एकाएकीं रंगून गेलों. पुस्तकांत वर्णिलेली विविध शास्त्रीय आश्चर्यें पाहून मी चकित झालों.

त्या ग्रंथानं पुरवलेली विलक्षण माहिती वाचतां वाचतां मी बेचैन झालों व बुद्धिवादाच्या सुखकल्पनेंत असतांना ज्या संतोषी मनोवृत्तींत मी शाळेंतून आलों होतों ती जाऊन परस्परविरोधी विचारांच्या कात्रींत माझं मन सांपडलं.

मला वाटलं, बुद्धिवादाचा गौरव आपण करतों पण त्याचं वास्तव स्वरूप व त्याच्या मर्यादा यांचा आपण कितपत नीट विचार करतों? जगात असंभाव्य व विस्मयानं मुग्ध करणाऱ्या गोष्टी आढळतांच त्यांजकडे निषेधाची नजर फिरवणं हें बुद्धिवादाचं लक्षण समजतां येईल कां? जी गोष्ट सामान्य अनुभवाच्या चाकोरीबाहेरची वाटते तिला दंतकथेच्या सदरांत ढकलणं यांत बुद्धिवादाचा गौरव होतो? आश्चर्याबद्दल आश्चर्य व्यक्त करणं यांतच बुद्धिवाद केंद्रित झालेला आहे असं म्हणतां येईल?

मला वाटतं बुद्धिवादाचा धांदलीनं पुरस्कार करणारीं माणसं शास्त्रीय नजरेचीं असतात असं म्हणणं जरा धाडसाचंच होईल. या विशाल जगतांत इतकीं अनंत आश्चर्यं भरलेलीं आहेत कीं, केवळ त्यांचं दर्शन घडतांच विस्मयचकित होऊन आपल्या बुद्धीचा पंगूपणा लपविण्यासाठीं निरनिराळ्या वादांचा आश्रय घेणारीं माणसंच फार! खरा बुद्धिवाद केवळ निषेधावर संतुष्ट नसतो. जगांतील आश्चर्यं पाहून आपल्या मर्यादित ज्ञानाच्या जोरावर या आश्चर्यांचा उपहास करण्यापेक्षां आपल्या अज्ञानाच्या जाणीवेनं वागणारा माणूसच बुद्धिवादाच्या मार्गावर आहे, असं मला वाटतं. क्षणभर निसर्गाकडे माणसानं नजर टाकली तर अखिल सृष्टि सोडून द्या—केवळ फुलांफळांचंच राज्य घेतलं तरी किती तरी विस्मयपूर्ण जीवन त्यांत आढळतं! कांहीं रूक्ष माणसाप्रमाणं फुलंही संगीतावर नाराज असतात, असं जर म्हटलं तर

एखाद्या बुद्धिवाद्याला हंसूही येण्याचा संभव आहे. पण अशी संगीतशत्रू पुष्पं निसर्गांत आहेत असं तें शास्त्रीय चमत्कारांचं पुस्तक मला धडधडीत सांगत होतं. दोन तीन महिने उपवास करणाऱ्या देशभक्तांचं आपणांला कोण कौतुक वाटतं ! पण तीन तीन वर्षं उपवास करणारे सर्प जगांत आहेत असं जर मीं म्हटलं तर कुणाला ती दंतकथाच वाटेल. दुतोंडी माणसं हा कदाचित् अलंकारिक शब्दप्रयोग वाटेल; पण शब्दशः दुतोंडी म्हणजे दोन तोंडं असलेले साप अमेरिकेंत आढळतात याला बिन माहितगार बुद्धिवादी थापही समजावयाचा. जे आपल्या बुद्धीला आकलन होत नाहीं, त्याला दंतकथेंत लोटावयाचं अशी धांदरट वृत्ति निर्भेळ बुद्धि-वादाचं पोषण करूं शकत नाहीं. भानुमास्तरांची चूक ती इथंच झाली असावी. बुद्धिवादाच्या वरवरच्या ज्या कल्पना त्यांना आढळल्या त्या त्यांना आकर्षक वाटल्या असाव्या व त्याच्या भांडवलावर त्यांनीं मुरार-बाजीची कथा दंतकथा म्हणून म्हटली. आपल्या अज्ञानाचं समर्थन करण्यासाठीं सत्याचं रहस्यमय स्वरूप टाळणारी माणसंच या जगांत फार. जर मास्तरांनीं संथपणें विचार करून एकदोन गोष्टी लक्षांत घेतल्या असत्या तर मुरारबाजीची ती कथा दंतकथा आहे असं म्हणण्याचं धाडस त्यांनीं केलं नसतं. कोंबडीची मान तोडली असतांनाही ती कांहीं वेळ तडफडत इकडे तिकडे उड्या मारीत असते, हें त्यांना ठाऊक नसावं. सरड्याचा जर कुणीं पाठलाग केला तर त्याला फसविण्यासाठीं तो आपली शेपटी टाकून देतो व पसार होतो. ही टाकलेली शेपटी कांहीं काळ रागानं आपटत उभी राहते. हेतु असा कीं, पाठलाग करणाऱ्या जनावराला सरडाच तेथें शेपटी आपटीत आहे असं वाटावं. प्राणिसृष्टींतील हे सत्यपूर्ण चमत्कार जर आपण लक्षांत घेतले तर इतिहासांत नमूद केलेला मुरारबाजीच्या धडाचा

पराक्रम दंतकथेंत जमा करण्याचा धांदरटपणा हातून घडणार नाहीं. पंगु बुद्धिवादापेक्षां सकस भावनांकितताच मला पसंत वाटते. म्हणूनच थंड व रूक्ष पद्धतीनं बुद्धिवादाची तरफदारी करणाऱ्या भानुमास्तरापेक्षां भावनेच्या लाटेंत वाहत जाऊन वर्गांत चैतन्य फुलविणारेच मास्तर मला अधिक आवडतात.

भानुमास्तरांच्या चष्म्याबद्दलचं माझं मत आतां बदललं आहे. त्याचीं भिंगं बुद्धिवादाचीं नसून केवळ कांचांचींच होतीं असं मला आतां वाटूं लागलं आहे.

# लेखणी व लाठी १२

अलीकडे एखादी म्हण किंवा सुभाषित वाचनांत आलं कीं त्याकडे संशयानं बघण्याची मला संवय लागली आहे ! वाटतं, यांत सांगितलेलं सत्य आपण भोळेपणानं खरंखुरं आहे असं समजतों. पण आपण आपल्या अज्ञानामुळं तर असं आंधळ्या विश्वासानं वागत नाहीं ? 'मुलांचे पाय पाळण्यांत दिसतात' ही म्हण एखाद्या पाळण्यांतल्या मुलालासुद्धां मान्य होणार नाहीं ! पाळणा जर असा आरशासारखा वापरतां येता तर कोण बहार उडती ! माणसाची कोण प्रचंड यातायात टळली असती ! पण पाळण्याला आरसा समजून कौतुकानं जवळ जावं तो केवळ लांकडाचाच केलेला आहे असा विषादयुक्त अनुभव येतो. 'निरोगी शरिरांत निरोगी मन वास्तव्य करतं' ही म्हणही अशीच रोगट असत्यानं भरलेली आहे. पुष्ट निरोगी देहांत जर खंबीर मन अचूक राहतं तर युरोपच्या उपाहारगृहांत चहा बिस्किटं ट्रेमध्यें घेऊन डौलानं फिरणारे इन्टर-नॅशनल बटलर्स हॉटेलांत कप-

बऱ्या विसळीत न बसतां राजकारणाचीं सूत्रं हलवीत बसले असते. जर ही म्हण खरी असती तर महात्मा गांधी घरीं खोकत बसले असते व सेवाग्रामचीं सूत्रं गामा कल्लूच्या हातीं जातीं ! जर या सुभाषितांत कांहीं सत्यांश असता तर सर पी. सी. रे दमेकऱ्याप्रमाणं घरीं कानटोपी घालून पिचत पडले असते व एखाद्या हनुमान व्यायाम मंडळांतील पटाईत पैलवान् कांचेच्या नळयांतलं द्रव्य निरखितांना दिसला असता. पण सुदैवानं म्हणा किंवा दुर्दैवानं म्हणा, अशी वस्तुस्थिति दिसत नाहीं; कारण या म्हणींत सत्यांश नाहीं—

कोणत्या म्हणींत तो असतो म्हणा !

उदाहरणार्थ, 'लेखणी ही तरवारीपेक्षां अधिक सामर्थ्यवान् आहे' असं एक सुभापित इंग्रजींत प्रसिद्ध आहे ! तें वाचलं कीं मला हंसूं फुटतं व मनांत विचार येतो,

'कोणत्या तरी मोल्जरकडून मार खाल्लेल्या लेखकानं हें तयार केलं असावं !'

म्हणे लेखणी तरवारीपेक्षां अधिक समर्थ !

या लेखकाला तरवारीची धार किती तीक्ष्ण असते तें माहीत नसावं ! एखादी लठितांतली बोथट कांबींची तरवार त्यानं पाहिली असावी नाहीं तर त्यानं अविचारानं तें वाक्य उद्गारलं नसतं !

—नुसत्या बळाचाच प्रश्न घेतला तर तरवार एका क्षणार्धात लेखणीची चटणी उडवील हें सांगायला प्रयोग करून दाखवायला नको !

पण क्षणभर लेखणीचं सामर्थ्य मान्य केलं तरी त्यामुळं हें सुभाषित सर्वसामान्यपणें कसं निर्दोष म्हणतां येईल ?

आपल्या लेखणीच्या पराक्रमानं राष्ट्रं, संस्था-सरकार चिरडून टाकणारे कलमबहाद्दर मधून मधून दृष्टीस पडतात. त्यांच्या लेखणीला तरवारीपेक्षां कांकणभर जास्त मानायला मी तयार होईन—

म्हणजे काय सर्वच लेखण्या तरवारीपेक्षां पराक्रमी समजाव्या? कांहीं कांहीं लेखण्या आपली जात विसरून जेव्हां लाठीप्रमाणं चालूं लागतात त्यावेळींदेखील त्या लाठीपेक्षां बलवान् समजाव्या?

जेव्हां जेव्हां एखाद्या अचरट संपादकावर, राजकीय पुढाऱ्यावर लोकांनीं हल्ला केल्याचं माझ्या कानांवर येतं, त्यावेळीं गंमत वाटून मी म्हणतों,

'पाहिलंत! लेखणीला पराक्रमी समजता काय! बघा तर आतां लाठीचा पराक्रम!!'

त्यावर कुणीं मला विचारलं,

'म्हणजे तुमचं मत असं कीं, लाठी लेखणीपेक्षा श्रेष्ठ?' तर मी सांगेन,

'कोण कुणापेक्षां श्रेष्ठ हा प्रश्नच येत नाहीं! तुम्ही लोक सुभाषितांचे शोकी असता म्हणून कांहीं तरी निश्चित विधान असलं म्हणजे तुम्हांला बरं वाटतं! पण खरं सांगायचं म्हणजे लाठी काय अन् लेखणी काय!—

'एक दुसऱ्यापेक्षां मोठी आहे आणि नाहींही! वापरणाराच्या कुवतीवर अवलंबून आहे ती गोष्ट!!'

जेव्हां वर्तमानपत्रांत शारीरिक हल्लयाची झळकलेली बातमी माझ्या नजरेस पडते, त्यावेळीं मुद्रणकलेनं असल्या हल्लयांना केवढी मदत केली आहे त्याची कल्पना येते. कुणी मुद्रणकलेचं तोंड भरून कौतुक करतात! या कलेच्या शोधामुळंचना ज्ञान, विज्ञान, शास्त्र, कला यांचं नंदनवन जगांत फुललं! तिनंच नाहीं का आंधळ्या जगाला डोळे दिले! तिच्या-

मुळेंच नाहीं कां वाङ्मयाच्या द्वारं माणूस निर्विकल्प आनंदाचा उपभोग घेऊं शकतो !

—मुद्रणकलेनं जगावर असले उपकार केले आहेत कीं नाहीं याचा मीं अजून नीट विचार केला नाहीं, पण तिनं लेखणीला कसलं तरी कैफ आणणारं मद्य पाजून बेहोष केली व जगांत मारामाऱ्या व हल्ले यांचं पीक निर्माण केलं याबद्दल मात्र मला शंका नाहीं.

कारण असं पाहा—

जेव्हां मुद्रणकलेचा शोध लागलेला नव्हता त्या वेळीं माणसाला आपलं मत मांडायला फक्त एकच मार्ग असे व तो म्हणजे एखादी सभा भरवून त्या सभेंत भाषण करून आपल्या प्रभावी वक्तृत्वानं लोकमत जिंकण्याचा. प्राचीन रोममध्यें निरनिराळया 'फोरमस्' मध्यें उभे राहून पुढारी व तत्त्वज्ञ आपलीं मतं मांडीत व कुतूहल वाटणारे लोक भोंवतीं जमून त्यांचं म्हणणं समजावून घेत. वक्ता व श्रोता यांचा असा निकटचा संबंध आल्यामुळं मतप्रदर्शनावर जो गंमतीचा परिणाम होई तो पाहा ! श्रोते समोरच असल्यामुळं आपलं अंतःकरण खुलं करण्याची सुवर्णसंधि प्रचारकाला मिळे. आपल्याला जें कांहीं सांगावयाचं आहे तें परिणामकारक रीतीनं सांगण्याची जबाबदारी अर्थातच वक्त्यावर पडे. कारण जर मुळमुळीतपणं किंवा आजागळपणं तो बोलूं लागला, तर त्याचं मत कुणाला पटणार ? यामुळं ज्याला आपल्या मतांचा प्रसार करण्याची इच्छा होई त्याला वक्तृत्वाची जादू प्रथम संपादन करावी लागे. प्राचीन रोममध्यें वक्तृत्वकला इतकी उत्कर्षाला पोंचली होती याचं कारण मुद्रणकलेचा शोध लागण्यापूर्वी आपलं मत स्वतः तोंडानं मांडण्याव्यतिरिक्त अन्य मार्ग माणसाला नसे व त्यामुळं वक्तृत्वाची थोरवी जाणून ती कला आत्मसात् करण्याशिवाय गत्यंतर

नसे. यामुळं मतप्रतिपादन हें प्रवाही, धांवत्या व आवेशयुक्त रीतीनं करणं भाग पडे.

याच्याच बरोबर या प्रतिपादनशैलीवर आणखी एका गोष्टीचा परिणाम होई. पुष्कळदा मतप्रतिपादन करतांना जर विवाद्य विषय असेल तर मत-विरोध प्रकट करावा लागे. आपल्या विरोधकावर टीका करून त्याच्या विचारसरणींतील व्यंगं दाखविण्याचं कटु कर्तव्य करावं लागे. जर त्याची तत्त्वप्रणाली चुकीची असली तर तिच्यांतील दोष व्यक्त करून श्रोतृजनांना ते पटवून देऊन त्याच्या बळावर आपलं मत त्यांच्या गळीं उतरविण्याची कामगिरी अंगावर पडे. विरोधकावर टीका करतांना मात्र त्याला जी मर्यादा संभाळावी लागे ती लक्षांत घेण्याजोगी आहे. केवळ विरोधकाचं व आपलं मत जुळत नाहीं म्हणून संयम सोडून वाटेल तसं बडबडण्याला त्याला वाव नसे. कुणीं सांगावं, त्या विरोधकाचे अनुयायी अथवा मित्र श्रोतृवृंदांत असावयाचे ! त्यांना ही फाजील आचरटपणाची टीका आवडली नाहीं तर ? केवळ विरोधक हजर नाहीं असं पाहून आपली जीभ मोकळी सोडून व त्याचबरोबर धरबंद सोडून वारा प्यालेल्या वासराप्रमाणं भडकण्याचं स्वातंत्र्य त्याला नसे. कारण अशी मर्यादा न पाळतां, विरोधकाबद्दल योग्य तो आदर न दाखवितां मवाली पद्धतीनं कुचेष्टा करूं लागला तर कुणीं सांगावं, श्रोतृसमुदायांतला एखादा साहसी श्रोता बेगुमानपणें वर चढून त्याची बत्तीशीही रंगवावयाचा ! जर विवेक वापरला नाहीं, सभ्यतेची मर्यादा संभाळली नाहीं, सारासार विचार न करतां तोंडाचा पट्टा सोडला तर विलंब न लागतां, तत्काळ त्या जागेंतच योग्य तें इनाम मिळण्याची भीति असल्या-मुळं वक्त्याला साहजिकच डोकं ताळ्यावर ठेवून व प्रतिपक्षाबद्दल आदर नसला तरी कां होईना पण भीति मनांत ठेवून टीका करावी लागे.

यामुळं जी टीका केली जाई तिच्यांत शिवीगाळीचा भाग नसे; फाजील कुचेष्टा नसे; वैयक्तिक गचाळ उल्लेख नसत. कारण या आचरटपणाबद्दल तत्काळ बक्षिसी मिळण्याचा संभव असे. तेव्हां टीकेला संयमित, उदार व शांत असं आपोआप स्वरूप येई. ही टीका आवेशपूर्ण असे, तिच्यांत मार्मिक उपहास असे पण हा आवेश व उपहास विवेकयुक्त असे; कारण वर सांगितल्या-प्रमाणं वक्त्यानंच मत मांडतांना विवेक दाखविला नाहीं तर श्रोतृवृंदांतील प्रत्येक व्यक्ति विवेक वापरीलच याची खात्री नसे. सारांश, प्राचीन काळीं मतविरोध दर्शवितांना अतिशय काळजी बाळगावी लागे.

पण मुद्रणकलेचा शोध लागतांच एक विस्मयजनक फरक घडून आला. मतप्रदर्शनासाठीं सभा भरविण्याची विशेष जरूर पडली नाहीं. जें काय आपल्याला म्हणावयाचं आहे तें लेखणीच्या द्वारं मांडण्याची उत्तम सोय झाली. त्यामुळं पूर्वीपेक्षां संख्येनं किती तरी पट अधिक अशा व्यक्तींपर्यंत मतांचं लोण पोंहोचविण्याचा मार्ग सुलभ झाला. यातायात कमी, पण सोय जास्त असा फायदा या कलेच्या शोधामुळं झाला. त्याचबरोबर आणखीही एक फायदेशीर सोय झाली व एक प्रकारचं संकट टळलं. पूर्वी मतविरोध दाखवितांना लोकांच्या समोर उभं राहून तो मांडावा लागत असल्यामुळं प्रचारकाला संयम, विवेक व भीति यांची कदर कशी बाळगावी लागे तें आपण पाहिलं. पण मुद्रणकलेचा शोध लागतांच असली काळजी बाळगण्याची विशेष जरूरी उरली नाहीं. आपल्या घरांत टेबलाजवळ बसून वाटेल तें लिहावं; छापून तें लोकांपुढं गेलं कीं संपलं काम ! व्याख्यान देतांना कुणी मध्येंच अडवील तर तें नाहीं; कुणी धमकी भरील तर तेंही नाहीं; कुणी वर प्लॅटफॉर्मवर चढून फाजीलपणाबद्दल ताब-डतोब शासन करील तर तीही भीति नाहीं. याप्रमाणं प्रत्यक्ष शारीरिक

हल्ल्याची भीति नष्ट झाल्यामुळं उथळ व विवेकशून्य टीकाकारावर त्याचा अनिष्ट परिणाम झाला. कुणी आपल्याला प्रत्यक्ष धमकावील अशी भीति न उरल्यामुळं लेखणीला आवरण्याची त्याला गरज वाटेना. 'आतां विवेकाचं कारण काय ! संयमनाची जरूर काय ! विरोधकाची इतकी पर्वा करण्याची गरज नाहीं !' अशा तऱ्हेची भ्रमिष्ट विचारसरणी त्याची झाली. त्यामुळं एक प्रकारचा राक्षसी आनंद व्हावा अशीच मुद्रणकलेनं त्याची दुहेरी सोय करून दिली. त्याला मनसोक्त खरडावयाला मुभा मिळाली व या खरडण्याबद्दल तत्काळ शासन होण्याची भीति उरली नाहीं. त्यामुळं अर्धवट वृत्तीच्या संपादकांनीं टीका करतांना ताळ सोडला, सभ्यतेकडे नाक मुरडलं, संयमाशीं वैर आरंभलं व मन मानेल त्याप्रमाणं दुगाण्या झाडण्यास सुरवात केली.

पण मुद्रणकलेनं जरी ही नूतन परिस्थिति घडवून आणली तरी या कलेचा शोध लागण्यापूर्वी मानवी मनाची जी रचना होती तिच्यांत ती थोडीच बदल करूं शकणार ?

ठोशाला ठोसा द्यावा अशी मानवी मनाची नैसर्गिक घडण आहे. अहिंसा हा या मनाचा सर्व परिस्थितींतील गुणधर्म नव्हे. कसलाही अन्याय झाला तरी अहिंसाव्रत सोडूं नये ही कृत्रिम विचारसरणी सुधारणेच्या गुंतागुंतींतून निर्माण झाली. पण तेजस्वी, स्वाभिमानी मनाला ती पटणारी नाहीं.

मुद्रणकलेनं तर या तेजदार जिवंत मनोवृत्तीची जवळ जवळ कुचंबणा केली ! ठोशास ठोसा कसा द्यावयाचा ! लेखकाची लेखणी छोटी खरी पण तिचा पराक्रम पाहावा तो एखाद्या जाडजूड लाठीसारखा ! पण आतां लाठी उगारण्यासाठीं जावं कुठं ! लेखणीनं केलेला अन्याय एखादा लेखणीनंच निपटून टाकील ! पण ज्याला लेखणी वापरता येत नाहीं त्यानं काय करावं ?

स्वस्थ बसणं, अन्याय निमूटपणं गिळणं, मनावर लेखणीनं होणारे निष्कारण घाव स्थितप्रज्ञाप्रमाणं सहन करणं हें जिवंत मनाचं लक्षण नव्हे ! पण अशा व्यक्तीनं करावं तरी काय ? तिला लेखणी तर वापरता येईना, पण दुसऱ्याच्या कलमानं केलेला आघातही सोसवेना ! साहजिकच ज्याला जी गोष्ट जमते ती गोष्ट माणूस करूं लागतो. हातपाय गेलेला माणूसही उरलेले अवयवाचे तुकडे हलवितांना दिसतो ! मग ज्याचे हातपाय शाबूत आहेत तो थोडकाच स्वस्थ बसणार ! तेव्हा लेखणीनं केलेला अन्याय आता लाठीनं परिमार्जन करून टाकण्याची कल्पना त्याच्या मनात यावी हें नैसर्गिकच नव्हे काय !

लेखणी व लाठी हीं दोन निरनिराळीं शस्त्रं वाटलीं तरी त्यांची योजना एकाच कार्यासाठीं होत असते हें विसरून चालणार नाहीं. केवळ या दोन शस्त्रांना किती लाकूड लागतं यावर त्यांचा निर्णय ठेवून भागायचं नाहीं. त्यांचं केवळ वजन ध्यानात घेणंही हिशोबी नव्हे ! एखाद्या लेखकाच्या लेखणीनं जर मर्मभेदक अन्याय केला तर त्या अन्यायाचं मोजमाप, त्याची तीव्रता अजमविण्याचं यंत्र जसं अद्याप निघालं नाहीं—तसं ते निघेल असंही वाटत नाहीं. त्यांतून एखाद्या लेखणीन किती अन्याय केला हें तिऱ्हाइताला म्हणजे ज्याला त्या लेखणीचा उपसर्ग पोहोंचलेला नाहीं त्याला अचूक सांगतां येणार नाहीं. ज्याच्यावर अन्याय झाला, ज्याला ती लेखणी झोंबली तोच या बाबतींत निर्णय देण्यास समर्थ आहे. तेव्हां आपल्यावरील अन्यायाचं परिमार्जन करण्यासाठीं त्याला झेपणारी, त्याला कार्यसाधक वाटणारी लाठी जर त्यानं वापरली तर केवळ लाठीचं वजन पाहात तिऱ्हाइतानं कांगावा करण्याचं कारण नाहीं त्यानं लाठीऐवजीं बंदूक वापरली नाहीं यावरून फार तर त्याला झालेल्या अन्यायाची थोडी फार कल्पना येईल.

सारांश, लेखणी व लाठी हीं दोन्हींही प्रभावीं शस्त्रं आहेत. तीं कोणीं व कशीं वापरावीं याबद्दलचा कातीवकोरीव नियम ठरवितां येणार नाहीं. ज्याला जें शस्त्र निष्णातपणें वापरतां येईल तें तो न सांगितलं तरी वापरणारच ! लेखणी वापरणारा तेवढा सुशिक्षित ही कल्पना वेडेपणाची आहे. पुष्कळसे लेखक आपली लेखणी आचरट विदूषकाप्रमाणं वापरतात, तर कांहीं विवेकशील माणसं लाठी योग्य त्या ठिकाणींच कामापुरती व ती चालवितांनाही थोडासा विचार करून वापरतांना दिसतील. लाठीचा तडाखा बसताच जरी शरिरावर वळ उठलेले दिसतात, तरी लेखणीचेही तडाखे तितकेच तीव्र असतात हें विसरून चालणार नाहीं. लेखणीनं मन रक्तबंबाळ होतं पण तें किती तें बघतां येत नाहीं. जर लाठीचा प्रहार बसून एखाद्या देहांतून तिऱ्हाईत बिचकावा इतक्या रक्ताच्या चिळकांड्या उडाल्या तरी त्याचा विशाद मानण्याचं कारण दिसत नाहीं ! पुष्कळदा रक्तस्रावानं तन्दुरुस्तीही होते म्हणतात !

निसर्गाचा कायदा मोठा निष्ठुर आहे ! क्षणैक लेखणीचा चमचमाट दिसला तरी कालांतरानं लाठीचा कडकडाट होणार हें निश्चित ! निसर्गाचा कायदा कृत्रिम मानापानाची पर्वा करण्याइतका हलका नाहीं. तत्त्वतः लेखणी व लाठी यांत तो भेद मानीत नाहीं. एक निष्कारण नाचूं लागला कीं दुसरा कोपऱ्यांतून पुढं सरकणार यांत संशय नको ! निसर्ग मात्र या दोघांची क्रीडा सारख्याच कौतुकानं हंसत पाहात असतो !

# साधेपणाचें सोंग १३

अलीकडे प्रसिद्ध देवळाप्रमाणं प्रसिद्ध सार्वजनिक व्याख्यानांच्या जागा कटाक्षानं टाळण्याचा माझा शिरस्ता आहे. प्रसिद्ध राममंदिर बघावं अगर वक्तृत्वानं फुललेलं भाषण वाचावं!—दोहोंतही 'राम' नसल्याचा अनुभव येत असल्यामुळं या दोन्ही जागा टाळण्याची मी खबरदारी घेत असतों. मी व्याख्यानानिमित्त कुठं बडोदा—हैद्राबादेकडे गेलों असतांना अशीच खबरदारी घेणाऱ्या लोकांवर सूड उगविण्यासाठीं मी अलीकडे व्याख्यानं टाळूं लागलों आहे असा कोणीं गैरसमज करूं नये. किंवा माणसांची गर्दी माझ्या शांतताप्रिय मनाला आवडत नाहीं असंहि नाहीं. क्रिकेटचा मोसम आला कीं अंगांत ताप असतांनाहि नामांकित सामने पाहतांना उत्साहाच्या उन्मादानं आरडा ओरड दंगल—धडपड करणाऱ्या जनसमूहांत मी आनंदानं व अधीरतेनं मिसळतों. किती मौजेची दंगल असते ती ! क्षणभर माणूस प्रौढपणाचं ओझं झुगारून देऊन बालवृत्तीनं आपला हर्ष—खेद मनमोकळे-

पणानं प्रगट करतो; गांभीर्याचा लटका वेष फेकून देतो व स्वतःच्या सामाजिक दर्जाचा विसर पडून क्षणैक खराखुरा जगतो.

सामाजिक शिष्टाचारानं पीडिलेल्या या जगात मनमोकळेपणानं भरपूर हंसतां—ओरडतांदेखील येत नाहीं हे स्वानुभवानं माहीत असल्यामुळं क्रिकेटचा मोसम येताच माझा अधिरेपणा अनावर होतो व कित्येक वेळा क्रीडांगणावर निशाणं रोवणारा पोरगा, व रोलर ओढणारे दोन बैल याची कामगिरी चालू असताना तंबूत येऊन बसल्याचं आठवतं !

—पण सार्वजनिक व्याख्यानाची जागा !

रानांत झुळझुळणाऱ्या झऱ्याचं गाणं आणि डासाचं गुणगुणणं यात फरक नाहीं का ? सार्वजनिक व्याख्यानाचे वेळीं जी प्रेक्षकांची कुजबूज चाललेली असते ती कानाजवळ गुणगुणणाऱ्या डासाप्रमाणं त्रासदायक वाटते. उलट क्रिकेट—मैदानावरील निःशंक हास्याचा स्वच्छंद विलास ! रानांतल्या जिवंत झऱ्याची प्रसन्नता त्यात असते.

—पण त्यादिवशीं मला व्याख्यानाला जावं लागलं. प्रेमळ मित्र व लहान मुलं यांच्यांत एकप्रकारें साम्य नाहीं ? दोघांचं मन मोडणं जिवावर येतं. अशाच एका जिवलग मित्रानं हट्ट धरला म्हणून मला टिळक स्मारक मंदिरांतल्या व्याख्यानाला जाऊन बसावं लागलं.

पण व्याख्यान इतकं मनोरंजक होईल अशी जर मला अगोदर कल्पना असती तर माझा व्याख्यानाबद्दलचा विकल्प सोडून अगदीं तिकिट काढून मी त्या व्याख्यानाला सर्वांचे अगोदर जाऊन बसलों असतों. कारण तें व्याख्यान कल्पनेबाहेर रंगलं. अगदीं बहार वाटली वक्तृत्वाचा तो अनिरुद्ध प्रवाह अनुभवितांना ! व्याख्यात्यांचं एका वाक्यांत वर्णन करायचं म्हटलं तर ते 'एक साधेपणाचे मूर्तिमंत अवतार' होते असं म्हणतां येईल. अंगांत

शुभ्र खादीचा एक अंगरखा व कमरेभोंवतीं आखूड धोतराची मिठी. मधून मधून ते प्रश्नार्थक वाक्यांचा श्रोतृवृंदावर वर्षाव करीत होते व त्यामुळं कुणीतरी तसाच हेल काढून त्यांची लगेच नक्कल करीत असल्यामुळं भरपूर करमणूकही होत होती. गंमत वाटून मी त्यांची वक्तृत्वाची चढती कमान पाहत होतों. शेवटीं भावनेच्या भरांत चेहरा लालबुंद झाला असतांना अतिशय कळकळीनं त्यांनीं समारोप केलाः——

"तेव्हां सांगायचा मुद्दा असा कीं, आपण आपल्या राहणींत आमूलाग्र सुधारणा केली पाहिजे. भपकेबाज पोषाख व आतां विलास पुरे झाले. विलायती उंची कपडे अंगावर चढवून दिमाखानं मिरविण्याचा काळ आतां गेला. विद्वान् माणसानं अंगावर डौलदार साहेबी सूट काय म्हणून घालावा ? हल्लींचे कॉलेजातले प्राध्यापक !...त्याच्याबद्दल सांगायला नकोच ! विलायतची नक्कल करणारे कपडे टाकून जर ते खादी वापरतील...(जोराच्या टाळ्या) तर काय सरस्वति त्याच्यावर रुसून बाहेर चालती होईल ? तीच गोष्ट आमच्या सणाची ! कशाला पाहिजेत हो ही सणाचीं सोंगं ? दिवाळी—दसऱ्यांचा तो थाटमाट पाहिला म्हणजे वाटतं...( याठिकाणीं त्याला काय वाटतं तें चटकन् न आठवल्यामुळं त्यानं नुसता आवंढा गिळून श्रोत्यांच्या कल्पकतेवर काय वाटतं तें सोंपविलं), त्याचप्रमाणं आपली जेवणाखाण्याची पद्धत घ्या ! काय ते मसाले ! काय त्या फोडण्या ! काय त्या चटण्या—कोशिंबिऱ्या ! ते ताटांतले सत्रा हजार तळकट करपट पदार्थ ! कशाला पाहिजेत हो हीं सोंगं ? काय साधंसुधं जेवण बलवर्धक नसतं ? आरोग्य-दायक नसतं ? तरी माझं आपल्याला एवढंच आग्रहाचं सांगणं आहे कीं, कपड्यांचा डामडौल सोडा, सणांचीं सोंगं झुगारून द्या व मसाले वापरून जिभेचं कोडकौतुक पुरवायचं सोडून द्या ! आपली भरतभूमि स्वतंत्र व्हावी

अशी इच्छा आहे ना ? परतंत्र राहूं नये असं वाटतं ना ? ती बंधमुक्त व्हाययास पाहिजे ना ? मग आजपासून साधेपणाची दीक्षा घ्या ! या साधेपणानंच हिंदुस्थानचा–या भारतवर्षाचा, आपल्या मातृभूमीचा उद्धार होणार आहे !!!" व तें शेवटचं वाक्य संपतांच टाळ्यांचा संमतिदर्शक प्रचंड कडकडाट झाला.

हिंदुस्थानासारख्या विशाल देशांत निरनिराळया तऱ्हेच्या सोंगांची भाऊगर्दी उडावी यांत नवल वाटण्याजोगं कांहीं नाहीं. पण आजकाल उसळलेलं हें साधेपणाचं सोंग विशेष मनोरंजक आहे. व्यक्तीप्रमाणं राष्ट्राची नाडीपरीक्षा करणारेही वैदू राजकारणांत असतात व असली ही स्वयंभू डॉक्टरमंडळी कौतुकास्पद उत्साह दाखवून बिछान्यावर तळमळणाऱ्या हिंदुस्थानची छाति तपासून आपापल्या परीनं औषधयोजना सुचवीत असतात. पारतंत्र्याचं विष प्यालेल्या हिंदुस्थानला साधेपणाचं इंजेक्शन द्या कीं तात्काळ रोग्याचं विष उतरून तो खडखडीत बरा होईल अशी भाषा बोलणाऱ्या वैदूंनीं आजकाल बरीच दंगल माजविलेली आहे. सकाळीं नऊ ते संध्याकाळीं चारपर्यंत कारकुनी केल्यानंतर तिच्याविरुद्ध सूड उगविण्यासाठीं कीं काय राजकीय वैदूगिरी करणारा एक खादीभक्त माझ्या शेजारीं राहतो. गृहस्थ पाहावा तर स्वभावानं गोड व मनमोकळा ! मजकडे येऊन संध्याकाळीं फोडणीचे पोहे खातांना स्वारी खूप असते; नव्हे जर या पोह्यावर कातरलेलं खोबरं घालावयाचं राहिलं तर त्याची आठवण करून देण्याइतका मार्मिकपणा त्याच्या अंगीं आहे. घरांत स्वारी आली कीं कोपऱ्यांतला ग्रामोफोन तोंड मिटून बसलेला त्यांना आवडत नाहीं; म्हणून लगेंच ते त्याला बोलके करतात. संध्याकाळीं फिरावयास जाण्याचा त्यांचा कार्यक्रम सिनेमाची सूचना करतांच मोडण्याचा लवचिकपणा त्याच्या अंगीं आहे. स्वच्छ पाण्यासारखं

सुंदर पेय नाहीं असं वरचेवर प्रतिपादन करूनही ' स्टँग कपा'ला नाकारण्याइतका तो हट्टी नाहीं. चैनीवर पैसे खर्च करणं अर्थातच त्याला आवडत नाहीं; पण मी जर माझी सिगरेटकेस पुढं केली तर ' कशाला प्रोफेसर तुम्ही या विलायती चैनीवर पैसे नासतां ?' असं म्हणत त्यांतली एक चटकन् उचलून व सफाईनं शिलगावून माझं मन न मोडण्याची बिचारा खबरदारी घेतो. कपड्याबद्दल म्हणाल तर स्वारी परम खादीभक्त ! प्राण गेला तरी खादी वापरणं सोडणार नाहीं असं एकदां ताजं ऑम्लेट खातां खातां आवेशाच्या भरांत तो बोलल्याचं मला आठवतं. पण तुम्ही राजकारणाचा जरा प्रश्न काढा कीं स्वारी हटकून म्हणेलः—

" कसलं राजकारण घेऊन बसलांत हो ! लोकांना विलायती चैनी पाहिजेत ! मसालेदार मेजवान्या पाहिजेत, थाटाचे लग्नसमारंभ पाहिजेत–अन् स्वराज्यही पाहिजे ! अहो मसाल्याचे तळकट पदार्थ जसे व्यक्तीच्या प्रकृतीला वाईट, तसेच विलास व चैनी या तळकट गोष्टी राष्ट्राला घातक ! आतां तुम्हीच सांगा चैनीची ओझीं अशी छातीवर घेऊन कां कुणी स्वराज्याची टेकडी चढलय् ?" व लगेच नकळत केसमधील सिगरेट उचलून तोंडांत घालील !

साधेपणाची सूतशेखर मात्रा हिंदुस्थानला चढविल्याशिवाय त्याची तन्दुरुस्ती अशक्य आहे अशी भाषा बोलणाऱ्या राजकीय धन्वन्तरींची आजकाल फार गर्दी उसळली आहे.

साधेपणाची आजकालची ही तरफदारी मोठी गंमतीदार आहे यांत शंका नाहीं. परवांच मी काऊंट टॉलस्टॉयचं चरित्र वाचीत असतांना मला एक शंका आली ! चरित्र लेखकानं काव्यसुंदर भाषेंत टॉलस्टॉयची ऋषितुल्य मूर्ति रंगविली होती ! ज्यानं वैभवांत व विलासांत लोळावं त्यानं फक्त अंगांत एक पांढरा झगा घालावा व एक कच्चा टोमॅटो खाऊन राहावं—

साधेपणाची ही परिसीमा नव्हे? पण जेव्हां टॉलस्टॉयचं तत्त्वज्ञान वाचूं लागलों त्यावेळीं त्याचा तो पांढरा झगा व लाल टॉमॅटो यांची मला भीति वाटूं लागली. "आपल्या कुटुंबाबद्दल अभिमान असणं हीदेखील आपल्या नैतिक विकासाला पायबंद घालणारी गोष्ट आहे!" हें त्याचं मत वाचतांच त्याच्या साधेपणाबद्दलच्या माझ्या विश्वासाला धक्का बसला. याच टॉलस्टॉयनं जगाला अहिंसेचं तत्त्वज्ञान सांगितलं—पण मला वाटलं या माणसाला साधा कसं म्हणावं? साधेपणाचं कोणते गुण याच्या अंगीं आहेत? साधेपणाची अशी मौज आहे कीं, या साधेपणाबद्दल जर माणसाला तीव्र जाणीव असेल तर कुपी उघडतांच उंची अत्तर उडून जावं, त्याप्रमाणं त्यातला साधेपणा चटकन् उडून जातो. साधेपणा हा आरोग्यासारखा असतो. निरोगी माणूस प्रकृतीची वा शरिराची चिकित्सा करताना दिसतो? फांसळ्या, स्नायु, हाडें, पचनक्रिया व श्वासोच्छ्वास यांजबद्दल विचार करण्यांत तो कधीं वेळ घालवतो? खऱ्या आरोग्याला, मोठेपणाप्रमाणं, स्वतःच्या अस्तित्वाची जाणीव नसते. साधेपणाची तीच गोष्ट. आपला साधेपणा दाखविण्यासाठीं जो साधेपणाचं तत्त्वज्ञान सागूं लागतो तो वास्तविक साधा माणूस नसतो. साधेपणा प्रगट करण्यासाठीं त्याला कोण यातायात करावी लागते! किती कृत्रिमपणा धारण करावा लागतो! टॉलस्टॉयची गोष्ट घ्या. त्याचं साधेपणाचं तत्त्वज्ञान वाचून तो सीधा व सरळ विचारसरणीचा माणूस आहे असं कसं म्हणावं? ज्या माणसाच्या विचाराची मजल 'कुटुंबाबद्दल आत्मीयता वाटणं हा-देखील आत्मिक प्रगतीला एक प्रचंड अडथळा आहे' असं मानण्यापर्यंत गेली तो कृत्रिम गुंतागुंतीच्या विचारसरणीचा माणूस नव्हे काय? साधेपणासाठीं कोण विचित्र धडपड ही! केवळ पांढरा झगा व लाल टोमॅटो यांच्या जोरावर हा कृत्रिम विचारसरणीचा माणूस साधा कसा म्हणावा?

आजकालच्या साधेपणाच्या तत्त्वज्ञानाची मला गंमत हीच वाटते कीं, ज्या महत्त्वाच्या बाबतींत साधेपणाची तरफदारी करावयास पाहिजे ती न करतां क्षुल्लक व गौण बाबतींत आवेशानं साधेपणाचा प्रचार चालू आहे. कदाचित् 'साधी राहणी व उच्च विचारसरणी' या उक्तीनं लोकांची दिशाभूल झाली असावी. सुंदर व सफाईदार पोशाखाची माणसाला जी आवड असते तिच्यांत आक्षेपार्ह असं काहीं आहे असं मला वाटत नाहीं. मनोहर व मनपसंत पोशाखापासून माणसाला एक प्रकारचा सौम्य आनंद होत असतो. उदात्त धर्मवचनं वाचून मन जितकं संतुष्ट होत नाहीं तितकं मनपसंत कपडे घालून होतं असं इमर्सननं कुठं तरी लिहिल्याचं मला आठवतं. माणसाला सुंदर कपड्यांची जी आवड असते ती केवळ त्याच्या लहरी रसिकतेची तृप्ति करण्यासाठीं. तिजबद्दल इतका गहजब करून तिच्यावर विकृतपणाचा आरोप करण्यांत विशेष स्वारस्य आहे असं मला वाटत नाहीं. असल्या नैसर्गिक गोष्टींना विकृत व आक्षेपार्ह ठरविणारं मनच कृत्रिम व विचित्र वळणानं जाणारं यंत्र असावं असा मला नेहमीं संशय वाटतो. माणसाचा साधेपणा त्याच्या तत्त्वज्ञानाच्या स्वरूपावरून ठरवावयाचा असतो. त्याची तात्त्विक विचारसरणी हीच त्याच्या साधेपणाची कसोटी म्हणतां येईल. बाह्य वेषांत फरक करणं ही गोष्ट अगदीं सोपी आहे. उंची डौलदार विलायती सूट टाकून एक साधा खादीचा अंगरखा अंगावर पेहेरणं अवघड थोडंच आहे? पण तात्त्विक दृष्टिकोनांतलीं व्यंगं जाणून त्यांतलं गुंतागुंतीचं शेवाळं काढून टाकून तो अधिक सुस्पष्ट व साधा करणं ही गोष्ट वाटते तितकी सोपी नाहीं. सुटाबुटांचा मोह सोडतांच छातीवर खादीप्रमाणं साधेपणाचं पदक आपोआप लटकूं लागतं तर कोण बहार होती! साधेपणा जर असा बदलत्या कपड्यावर अवलंबून असता तर अंगाला केवळ

राख फासून ईश्वराचे प्रेषित म्हणून मिरविणारे साधू-संन्यासी साधेपणाचे आदर्श धरतां आले असते. पण आपण क्षणभर थांबून एखाद्या असल्या साधुमहाराजांबरोबर बोलूं लागावं तो अज्ञानानं व अर्धवट कल्पनांनीं लिडबिडलेल्या त्याच्या मनाची तात्काळ कल्पना येते ! परमेश्वरविषयक त्याच्या खुळ्या व मूर्ख श्रद्धेच्या कल्पना पाहतांच अज्ञानानं निर्माण केलेल्या शेवाळयांत त्याचं मन अडकून ते गुदमरून गेल्याचं दिसून येतं. स्वतःच्या कर्तृत्वाबद्दलच्या अविश्वासांतून निर्माण झालेली व पंगु व दुर्बळ मनाला आवडणारी त्याची ईश्वरविषयक निष्ठा पाहून साधेपणाचा संपर्कही त्याला लागलेला नाहीं याचा आपल्याला विस्मयकारक अनुभव येतो.जी गोष्ट आपल्या इकडील साधुसंतांची तीच युरोपांत वावरणाऱ्या धर्मगुरूंची व खिस्ती धर्माची ज्योत हिंदुस्थानांत पाजळविण्यासाठीं आलेल्या दांभिक,अर्धवट व अज्ञानी धर्मप्रचारकांची अहमदाबादेस माझी एका इंग्रज मिशनऱ्याशीं बरीच जानपछान झाली आहे. हा गृहस्थ सुमारें चाळीस-बेचाळीस वर्षांचा असून या बाजूला बराच प्रसिद्ध आहे. त्यानं लंडनला किंवा कुठं तरी 'डिव्हिनिटी' या विषयांत बी. ए. ची डिग्री घेतलेली आहे व तीहि पहिल्या वर्गात असं मला त्याचेकडून व त्याच्या एका मित्राकडून कळलं. अर्थात् ती माहिती कळतांच त्याच्या हुशारीचं कौतुक वाटून मी त्याचा व माझा जास्त परिचय व्हावा अशी व्यवस्था केली व त्यांत मी यशस्वीहि झालें. पण लवकरच मला त्याचा कंटाळा आला. सुरवातीला आमच्या ज्या गप्पा सुरू झाल्या, त्यांतच त्याची विचित्र मनोवृत्ति मला दिसून आली. मी त्याला बायबलमधल्या खिस्ताच्या चमत्कारांची माहिती विचारली व त्यांच्या खरेपणाबद्दल संशय प्रगट करतांच तो मजवर चिडूं लागला. एकदां 'येशू खिस्त हा एक सद्भावनेचा दयाळु पुरुष होऊन गेला; त्याला मी देव म्हणायला तयार

नाहीं; नव्हे देव ही चीजच मला कळत नाहीं,' असं मी म्हणतांच जणूं बर्फावरून घसरल्यासारखं त्याला वाटलं व माझ्या शंकेला नीट उत्तर न देतां त्यानं ख्रिस्ताची स्तुति करण्यास सुरवात केली. मीं म्हटलं माणसाला देवाची जरूर आहे असं मला वाटत नाहीं! त्यावर त्यानं 'ज्या राष्ट्रांतल्या लोकांचे विचार असे अधार्मिक आहेत त्याला उज्ज्वल भविष्य नाहीं' असे केडगांवच्या महाराजांना शोभणारे उद्गार काढले. ख्रिस्तानं केलेल्या प्रत्येक चमत्कारावर आपला विश्वास आहे असं तो अभिमानानं म्हणत असतों; पुनरुत्थानाच्या कल्पनेवर तर त्याचा कल्पनेबाहेर विश्वास आहे. एकदां तर मी त्याचे खोलीवर गेलों असतांना जेरुसलेममध्यें ख्रिस्त असतांना त्यानं वापरलेल्या मडक्यांचे कांहीं तुकडे त्यानें मला दाखविले. ज्या पेटींतून हे तुकडे त्यानं काढून दाखविले ती ऑस्ट्रेलियातून आलेली होती. ते तुकडे पाहतांच मला हंसू आवरेना. पण केवळ तो चिडेल म्हणून मला वरकरणी गांभीर्य धारण करावं लागलं.

जेव्हां जेव्हां मी या माणसाचा विचार करतो त्यावेळीं मला त्याच्या मनाच्या पंगूपणाचं नवल वाटूं लागतं. असल्या श्रद्धाळु मनोवृत्तीच्या माणसानं जीवनाबद्दल किती विकृत व गुंतागुंतीच्या कल्पनांचं वेटोळं मनांत वागविलं आहे! धार्मिकता, अंधश्रद्धा, इत्यादि दुष्ट विकारांनीं त्याचं मन पोखरून गेलेलं आहे! पण या माणसाचा पोषाख पाहाल तर एक लांबलचक पायघोळ पांढरा झगा व कंबरेला जाड पिवळ्या दोरीचा वेढा! मला वाटतं त्याचं खाणंपिणंदेखील साधं असावं; कारण बोलतां बोलतां त्यानं मांसाहाराविरुद्ध आपलं मत प्रगट केल्याचं मला आठवतं! अगदीं टॉलस्टॉय पद्धतीवर पोषाख केलेला तो इंग्रज मिशनरी! त्याचं धार्मिक कल्पनांनीं लिडबिडलेलं तें मन पाहतांच त्याला साधा कोण म्हणेल? टिळक

स्मारक मंदिरातील तो रसाळ व्याख्यान झोडणारा वक्ता मात्र याला बघतांच आनंदानं ओरडला असताः

" बस्स ! याला म्हणतात माणूस ! कोण साधी राहणी ! विचार किती धार्मिक व मनोवृत्ति किती देवभीरु !" खरी गोष्ट अशी आहे कीं, साधेपणा हा बाह्य आवरणावर अवलंबून नसून अन्तःकरणाच्या रंगावर तो अवलंबून असतो ! आपल्या मनांतील तत्त्वप्रणालीच्या घडणीवरून तो ओळखावयाचा असतो ! व्यक्तीच्या मनांतील विचारांची ठेवण साधी, निर्मळ व नैसर्गिक आहे कीं फाजील सात्त्विक व म्हणून कृत्रिम व गुंतागुंतीची आहे यावर या साधेपणाचा निर्णय अवलंबून असावयास पाहिजे ! एखाद्या व्यक्तीनं माझ्या मतं प्रथम गंजीफ्राक, नंतर घट्ट टायचा शर्ट, त्यावर जाकीट, त्यावर स्वेटर व नंतर सूट याचे थर चढविले तरी फिकीर नाहीं; या वरवरच्या वस्त्रांकडे वाजवीपेक्षा जास्त आपण लक्ष द्यावं असं मला वाटत नाहीं; खरं लक्ष द्यावयाचं तें त्याच्या मनांतील तात्त्विक विचारसरणीकडे ! जर ही विचारसरणी साधीसुधी, कृत्रिमतेचा विटाळ नसलेली, सीध्या मार्गानं जाणारी असेल तर मी त्या व्यक्तीला साधी व्यक्ति म्हणेन ! त्या व्यक्तीनं मसालेदार पदार्थांची कितीही स्वतःसाठीं रेलचेल केली तरी मला त्याचं विशेष वाटणार नाहीं ! तळलेला मासा खातांना या मसाल्याची वाफ व चव त्याच्या विचारांना लागलेली आहे किंवा काय याचा मी विचार करीन ! दिवाळी–दसरा, विवाह–समारंभ यांतील गंमती व मौजा यांत त्यानं आनंद मानला तर मला तें नैसर्गिक वाटेल; जर त्याला या गोष्टींचा तिटकारा वाटला तरच त्याचे साधे विचार डागळत चालले आहेत असं मी समजावयास लागेन. आपले विचार अतिशय साधे व्हावे या विचारानं जेव्हां मनुष्य साधेपणाचं तत्त्वज्ञान प्रचारूं लागतो त्याचवेळीं त्यानं

साधेपणाला तिलाजली दिली असं खुशाल समजावं ! हिंसा ही मोठी स्पृह-णीय गोष्ट नाहीं हें खरं; पण अहिंसा ही तरी काय स्पृहणीय गोष्ट म्हणतां येईल? सदैव हिंसा करणारा मनुष्य जितका विचित्र तितकाच सदैव अहिंसेची कास धरणारा मनुष्य म्हटला पाहिजे! जसं आपण उगचच दुस-ऱ्याचा जीव घेता कामा नये; तसंच आपण आपला उगाचच जीव देतांहि कामा नये! जो निष्कारण दुसऱ्याला धक्का मारील तो जसा शहाणा नव्हे तसंच जो धक्का मारणाराला प्रतिकार करणार नाहीं तो जीविताचं नैसर्गिक तत्त्वज्ञान विसरून व साधेपणाचा अतिरेक करून अतिशय कृत्रिम गुंतागुं-तींत शिरत आहे असं का म्हणूं नये? टॉलस्टॉयचं अहिंसेचं खूळ जसं कृत्रिमतेचं तसंच त्याचं देशप्रेम व कुटुंबप्रेम याबद्दलचं विधानही विलक्षण कृत्रिम व अनैर्गिक म्हटलं पाहिजे! साधेपणाच्या मागं लागून तो साधेपणा विसरला हेंच खरं. अंगात झगा घालून व कच्चा टोमॅटो खाऊन तो केवळ स्वतःच्या मनाची फसवणूक करीत होता !

—म्हणून म्हणतों आपण हें **साधेपणाचें सोंग** टाकून दिलं पाहिजे. कपड्याचा साधेपणा ही गौण गोष्ट आहे. जेवणांतले मसाले आणखी वाढले तरी फिकीर नाहीं; फिकीर करायची ती मनांतल्या विचारांची, अन्तः-करणाच्या रंगाची, जीवितविषयक आपल्या तत्त्वप्रणालीची! या विचा-रांची घडण जाड सुटासारखी नसली म्हणजे झालं! जीवितविषयक तत्त्व-ज्ञानाला मसाल्याचा वास येणार नाहीं एवढीच तत्परता घ्यावयाची! आपला दृष्टिकोन तळकट नसला म्हणजे झालं.

ही काळजी घेतली म्हणजे उंची सूट चढवून तळलेल्या माशावर काटा-चमचा चालविला तरी हरकत नाहीं. कारण हातांत टोमॅटो घेऊन

त्या माणमानं आपली फसवणूक तरी करून घेतलेली नसते ! अंगांत साधा झगा घालण्याच्या आनंदांत आपल्या विचारांकडे त्यानं दुर्लक्ष केलेलं नसतं.

—म्हणूनच मला नेहमीं वाटतं कीं, लालबुंद चेहरा करून कपडे, जेवण व मण यांचेविरुद्ध रागाचं हत्यार उचलणाऱ्या टिळक स्मारक-मंदिरांतील त्या वक्त्यानं टोमॅटोच्या लाल रंगानं हुरळून जाऊन या महत्त्वाच्या गोष्टीकडे दुर्लक्ष केलेलं असावं; नाहीं तर त्यानं हिंदुस्थानच्या उद्धाराची ती विनोदी मीमांसा केली नसती !

अहमदाबाद,<br>ऑगस्ट १९४०

——

# हरवलेला मित्र १४

माझ्या लेखनाच्या खोलींतल्या फिरत्या बुककेसमधलीं पुस्तकं जेव्हां मी चाळूं लागतों त्यावेळीं किती तरी अनिर्वचनीय स्मृतींनीं मन भारावून जातं, किती विविधरंगी भावनाचा कल्लोळ मनांत उसळून अंतःकरणांत हुरहूर सुरू होते. या केसमधलीं बहुतेक पुस्तकं जुनीं आहेत. नव्हे, कांहीं कांहीं तर चार हाडांनीं कसंबसं एकत्र तगून राहिलेलं वृद्ध माणूस जसं दिसतं तशीं सुटीं सुटीं पानं आहेत; पण वृद्ध व्यक्तींबद्दल प्रेमादर वाटावा इतका जिव्हाळा वाटतो मला या जुनाट फाटक्या पुस्तकांबद्दल ! कारण या प्रत्येक ग्रंथाचं पानन् पान पूर्वायुष्यांतील स्मृतींनीं रंगलेलं आहे. इतकंच नव्हे, तर कांहीं कांहीं ग्रंथांभोंवतीं इतक्या नाजुक भावनांचा पाश पडलेला आहे कीं, तीं पुस्तकं हाताळतांना जर हळुवारपणानं मला तीं धरतां आलीं नाहींत तर या कोमल भावनांना कुस्करल्याइतकं दुःख मनाला होतं.

उदाहरणार्थ, चिपळूणकरांची 'निबंधमाला'च पाहा ! ज्या परिस्थितींत मी ती विकत घेतली ती मला अजूनहि ठळकपणानं आठवत आहे.

पुण्याला रविवारीं जुना-बाजार भरत असतो. या बाजारांत जुन्यापुराण्या परंतु उपयुक्त वस्तु थोड्या किंमतींत मिळू शकतात. 'नूतन मराठी'त शिकत असतांना-मला वाटतं, मी इंग्रजी पाँचवींत होतो तेव्हां—शास्त्रीबुवांची थोरवी आमचे शिक्षक आम्हाला वर्णून सांगत ! त्यामुळं शास्त्रीबुवाचं नांव निघालं म्हणजे मन एकदम जादूनं भारल्यासारखं होई ! त्यांची उज्ज्वल देशभक्ति, करडी तत्त्वनिष्ठा, अलौकिक भाषाप्रेम, निरलस मनोवृत्ति व सात्त्विकता यांचा आमच्या मनावर इतका ठळक ठसा बसलेला होता कीं, त्यांच्या-बद्दल कुणीं उल्लेख काढला कीं, मन अद्भुतरम्य कल्पनांची जाळीं विणीत राही. एके दिवशीं शनिवारातून चाललों असताना पाय सहज या जुन्या बाजाराकडे वळले आणि वाचनाची आवड लहानपणापासून असल्यामुळं एका कोपऱ्यावर जुनाट पुस्तकाचा ढिगारा अस्ताव्यस्त पडला होता तिथं थाबलों. बराच वेळ निरनिराळीं पुस्तकं चाळून पाहिल्यानंतर निबंध-मालेचीं काहीं फाटकीं पानं दृष्टीस पडलीं. अधीरतेनं तीं ओढून काढलीं तों तीं मधलींच सत्तर—बहात्तर पानं निघालीं; आणखी थोडा वेळ पुस्त-काची हालवाहालव केली तो आणखी मधलीं चाळीस—बेचाळीस पानं सांपडलीं. त्यात डॉ. जॉन्सनवरील अर्धवट फाटका निबंध होता. हीच माझ्या संग्रहाची चिपळूणकरांची विख्यात **निबन्धमाला** !

मला आठवतं, मीं तीं पानं एकत्र केलीं व त्यांची किंमत किती पडेल याचा विचार करूं लागलों. खिशांत अवघे पांच पैसे होते.त्या पुस्तकांची मालकीण एक म्हातारी मुसलमान कुबडी बाई होती. मी तिच्यापुढं तीं पानं धरून म्हणालों,

"अम्मा, याचे किती पैसे?"

तीं फाटकीं पानं पाहून तिला विस्मय वाटला असावा. कारण ती म्हणाली—नव्हे, कांहीं न म्हणतां हंसली ! वार्धक्यामुळं तिची विद्रूप झालेली

मुद्रा ! पण त्या मुद्रेवरचं तें हास्य किती प्रेमळपणाचं, थोर व हृदयंगम होतं ! त्या हंसण्यानं तिनं जणूं दर्शविलं, "वेड्या, हीं फाटकीं पानं रे तुला कशाला पाहिजेत इतकीं धड अन् जाड जाड दुसरीं पुस्तकं पडलीं असतांना ?"

एक क्षणभरानं ती म्हणाली, "कसलीं पानं रे हीं मुला ?"

"आहेत आमच्या अभ्यासाचीं !"

त्यावर एकदम कुतूहलानं तिनं विचारलं, "तूं अभ्यास करतो ? शाळेंत जातो ?" व तिनं माझ्याकडे निरखून बघितलं.

"हो ! माझा वर्गात दुसरा नंबर आहे !" मी म्हणालों.त्यावर तिनं क्षणभर विचार केला; पुस्तकाकडे पाहिलं व माझ्याकडे बघत ती म्हणाली "मग जा घेऊन तुला फुकट हीं पानं ! माझं पोरगं वाईट निघालं ! शिकलं नाहीं ! वाईट पोरांच्या नादीं लागून बिघडला अन् आतां बसलाय् तुरुंगांत ! जा बाबा; घे तुला तीं पानं ! अन् हें बघ, नीट अभ्यास कर बरं ! आईला त्रास देऊं नको बाबा ! नाहीं तर माझ्या-म्हातारी-सारखी तिची स्थिति होईल !" त्या वृद्ध बाईच्या डोळयांत चमकलेले अश्रू मीं पाहिले.

बुककेसमधली ती फाटकी अपुरी 'निबंधमाला' पाहिली म्हणजे मला चटकन् तो प्रसंग आठवतो व त्या प्रेमळ वृद्धेची आठवण होऊन मनांत विचित्र कालवाकालव सुरू होते.

चिपळूणकरांबद्दल विलक्षण आदर असल्यामुळं घरीं येतांक्षणींच तीं फाटकीं तुटकीं पानं वाचावयास सुरवात केली.तीं शंभर-सवाशें पानं केव्हांच वाचून पुरीं झालीं. वाचतां वाचतां एका पानावर कुणीं तरी पेन्सिलीनं लिहिलेलं होतं—

"दादा इतका शिकलेला; पण तो घरांत असा कां वागतो बरं ! घरांतल्या माणसाबरोबर आम्हांला नीट वागतांहि येऊं नये ! काय उपयोग या शिक्षणाचा ?"—भाऊ.

कोण बरं हा भाऊ ! कोणत्या परिस्थितींत त्यानं खऱ्या उद्वेगानं तें महत्त्वाचं लिहिलेलं वाक्य असावं ? आज इतकीं वर्षे झालीं; पण तें वाक्य माझ्या स्मृतींत सदैव ताजं आहे व एखाद्या उपकारक दीपगृहाप्रमाणं त्यानं मला आजपर्यंत संभाळून नेलं आहे. कुठं असेल या वाक्याचा लेखक ? तो जिवंत असेल कां ? त्यानं माझ्यावर केलेल्या उपकाराबद्दल कृतज्ञता व्यक्त करावी असं किती तरी वेळां वाटतं ! पण तो कुठं भेटणार मला ?

माझ्या बुक-केसमधल्या इतर ग्रंथांभोंवतीं असाच कोमल स्मृतींचा पाश आहे. घरची अतिशय गरिबी; त्यामुळं केवळ शिष्यवृत्तीवर व बक्षिसांच्या पैशावर सहावीपर्यंतचं शिक्षण उरकलेलं. मॅट्रिकच्या वर्गांत गेलों तों घरची स्थिति फारच बिघडलेली होती. पण त्यांतूनही अडचणींना न जुमानतां पैसा हातांत पडतांच मीं माझी पुस्तकांची हौस फेडून घेतलेली आहे. अर्थात् तीं बहुतेक जुनीं, फाटकीं व डागळलेलीं आहेत. या जुन्या पुस्तकांपैकीं मीं सर्वच वाचलेलीं आहेत असं नव्हे. कांहींचीं आठ दहा पानं फार तर वाचलेलीं असतील व कांहींचं फक्त शेवटलंच वाक्य वाचून वाचन संपविलेलं आहे. एक दोन पुस्तकांना तर विकत घेतल्यानंतर जागेवरून हालविलंहि नाहीं; किंवा फार तर हालविलं असेल, एवढंच ! पण त्यांच्या वाचनानं जितका जन्मभर परिणाम होणार नाहीं, इतका केवळ त्यांच्या दर्शनानं होतो. कारण ज्या परिस्थितींत तीं विकत घेतलीं तीच इतकी विचित्र व म्हणून वैशिष्ट्यपूर्ण होती कीं, पुस्तकांचं दर्शन होतांच पूर्वीचे ते गंमतीदार दिवस नजरेसमोर उभे राहतात व मनांत विचित्र व अनिर्वचनीय अशी कालवाकालव सुरू होते.

उदाहरणार्थ–'पण लक्षांत कोण घेतो ?' ही हरिभाऊंची कादंबरी-किंवा तिचीं पहिलीं चार प्रकरणं गेल्यानंतर उरलेली प्रत म्हणा,–मीं किती

चमत्कारिक परिस्थितींत विकत घेतली! १९२०-२१ साल असावं तें. त्यावेळीं पुण्यांत प्लेगचा कहर उसळला होता. कसबा पेठेंत तर प्लेगनं आपलं भयंकर हत्याकांड सुरू केलं होतं.

एक दिवस असाच शाळेंत शिकत असतांना माझ्या वाचनप्रियतेची माहिती असलेला सदू गोखले माझ्याकडे धांवत धांवत आला व म्हणाला,

" अरे भाऊ, तुला एक आनंदाची बातमी सांगूं? "

मीं उत्सुकतेनं म्हटलं, " कसली रे? सांग ना! "

" फारच आनंदाची आहे! तूं तर नाचायला लागशील! "

" सांगशील तर खरं? "

" कसब्यांतलं— "

तो शब्द ऐकतांच मी एकदम दचकलों. तेथें प्लेगोबांनीं नुकत्याच चालविलेल्या धुमाकुळाची भयंकर माहिती मला कळली होती अन् हा बाळ्या म्हणे तिकडची आनंदाची बातमी सांगणार!

असा क्षणार्धांत माझ्या मनांत संशय चमकून गेला; पण मी माझं आश्चर्य आवरून त्याची बातमी ऐकूं लागलों.

" कसब्यांतलं तें जुन्या पुस्तकांचं दुकान आहे ना? "

एकदम कुतूहल जागृत होऊन मी उद्गारलों, " बरं, बरं! म्हणजे तें तोरण्याचं? "

" यस्! राइट!! तिथं दोन दोन आण्यांना मोठमोठीं पुस्तकं विकायला ठेवलीं आहेत! तुला आपट्यांची कसली तरी कादंबरी पाहिजे होती ना? आपट्यांच्या कादंबऱ्या तर त्याच्या दुकानांत फार आहेत! "

" खरं? हो! तें मला माहित आहे! मी एकदां गेलों होतों तिथं! " पण लगेच कसला संशय येऊन मीं विचारलं,

"काय रे, असा दोन आण्यांत कां लिलांव चाललाय् तिथं? आपट्यांची एकेक कादंबरी म्हणजे दोन रुपयांखालीं मिळणं शक्य नाहीं. अन् तूं म्हणतोस कीं—"

"त्याचं कारण आहे ना!"

"कसलं कारण?"

"त्याचा मालक बाबा तोरणे परवांच प्लेगनं मेला! तेव्हां त्याच्या मागं बायकोला खायला अन्न नाहीं म्हणून ती कोणतंहि पुस्तक दोन आण्यांना देते!"

ती बातमी आनंददायक होती खरी! कारण आपट्यांची 'पण लक्षांत कोण घेतो?' ही कादंबरी—तसली अवघड कादंबरी त्यावेळीं कां पाहिजे होती तें अजूनही कळत नाहीं—मिळविण्यासाठीं मी बरेच दिवस धडपडत होतों. नवी प्रत विकत घेणं शक्य नव्हतं; कारण तिला अडीच रुपये पडत होते. तेव्हां एखाद्या जुन्या प्रतीच्या शोधांत मी होतों. पण जी एक जुनी प्रत तोरण्याच्या दुकानांत दिसली होती तिला पंधरा आणे पडत होते! साहजिकच निराश होऊन मला गप्प बसावं लागलं होतं!

पण आतां ऐकतों तों ती कादंबरी दोन आण्यांना मिळणार होती! पण तिकडे जावयाचं कसं? प्लेगनं तिकडे राक्षसी स्वरूप धारण केलं होतं.

वर्गांत तास चालू असतांना माझ्या डोक्यांत फक्त ती कादंबरी घोळत होती.

शेवटीं मनाचा निश्चय केला व शेवटल्या तासाला चाट देऊन मी त्या दुकानाकडे निघालों. आतां तीनचार मिनिटांत आपल्याला पुस्तक मिळणार या आनंदांत मी होतों; इतक्यांत 'राम बोलो भैराम्' असे घोगरट व भेसूर आवाजांतले शब्द कानांवर आले. दचकून मी बघतों तों डाव्या आळींतून एक प्रेत घेऊन चार माणसं येतांना दिसलीं.

तो भयंकर देखावा अगदीं कालपरवा घडल्यासारखा मला ठळकपणे आठवत आहे ! कसा काय कुणास ठाऊक, एकदाचा धीर केला आणि धांवतच दुकानांत शिरलों; तिथं पडलेल्या अडगळींतून माझी कादंबरी शोधून काढली, तिथं बसलेल्या एका तिरक्या डोळ्याच्या पोराच्या अंगावर दोन आणे टाकले व धांवत सुटलों !

घामानं उपळलेल्या स्थितींत घरीं आलों व उत्सुकतेनं पुस्तक उघडतों तों त्याचीं पहिलीं चोवीस पानं नसल्याचं दिसून आलं ! पंचविसाव्या पानावर 'आजोबा आणि आजीबाई' असं कांहींतरी वाचल्याचं आठवतं ! तदनंतर मीं तें पुस्तक कधीं उघडलेलं नाहीं; पण केसमध्यें उभी राहिलेली ती कादंबरी दृष्टीस पडतांच बालवयांतील त्या विचित्र साहसाची आठवण होते व एकंदर देखावा नजरेसमोर स्पष्टपणें उभा राहतो.

कांहीं कांहीं पुस्तकं तर मीं पोटांत ओरडणाऱ्या कावळ्यांकडे दुर्लक्ष करून विकत घेतलेलीं आहेत. एकदां भुकेनं काहूर केलं असतांना व हॉटेलांत शिरत असतांना शेजारच्या दुकानांतला **रघुवंश** मीं विकत घेतलेला आहे. त्यांतले अर्धे सर्गही मीं धड वाचलेले नाहींत; पण त्या ग्रंथाकडे पाहिलं म्हणजे बालपणीं सहन केलेल्या अडचणींची आठवण होऊन स्वतःचं स्वतःलाच कौतुक वाटतं. सिनेमाचे पैसे एकत्र करून **शाकुंतल** विकत घेतलेलं आहे व कोटासाठीं कापड आणण्यासाठीं जाऊन कापडाऐवजीं रासेलसचं मराठी भाषांतर, 'बाळमित्रा'ची वरणाचा डाग पडलेली प्रत व 'अरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी' आणल्याचं आठवतं. अर्थात् त्याबद्दल एक आठवडाभर घाबरलेल्या स्थितींत कोपऱ्यांत बसून मुळूमुळू रडावं लागलं ती गोष्ट वेगळी !

महाराष्ट्रांत रवींद्रनाथ टागोर शांतिनिकेतनच्या प्रचारकार्यासाठीं आले असतांना त्यांनीं आमच्या शाळेला भेट दिली. आम्हां मुलांना रांगेनं उभं केलं होतं व टागोर येतांच त्यांना वंदन करायचं असं आम्हांला सांगितलं होतं. सर्वांकडे प्रेमळपणें हंसत जाणारी कविवर्यांची ती वृद्ध ऋषितुल्य मूर्ति, त्यांची पांढरी शुभ्र दाढी व वाऱ्यांत झुळझुळणारा रेशमी पांढुरका झगा अजूनही मला स्पष्ट आठवत आहे. शाळेंतून कविवर्य निरोप घेऊन मोटारींत बसूं लागले तेव्हां शाळेतर्फे त्यांना केशवसुतांच्या कवितांचं पुस्तक भेटीची स्मृति म्हणून बहाल करण्यांत आलं.

कोण बरं हा केशवसुत ? इतक्या चांगल्या कविता तो करतो ?–त्या थोर लेखकाला बक्षीस द्याव्या इतक्या ?

याप्रमाणं माझ्या मनांत विचार घोळूं लागले.

तें पुस्तक कांहीं झालं तरी विकत घ्यायचं मीं ठरविलं. रात्रीं स्वप्नांत तर तें पुस्तक विकत घेतल्याचा आनंदहि भोगला. सकाळीं तोंड धुण्यासाठीं मोरींत गेलों व तोंड धुऊन टॉवेलनं पुशीत उभा होतों तों खिडकींत कांहीं तरी चमकल्यासारखं वाटलं ! कुतूहलानं मीं हातांतल्या ब्रशानं तिथं हलवलं तों चांदीची चकचकीत अधेली त्या जागेवरून निसटून खालीं पडली व तिचा श्रुतिमधुर आवाज झाला. मीं चटकन् ती अधेली उचलली. पण मनांत विचार आला, कुणाची असेल बरं ही ? आईची तर चुकून राहिली नसेल ? चहा घेत असतांना व नंतर जेवत असतांना अधेली गमावल्याबद्दल कुणाला गडबड होते कीं काय तें बघत होतों. कुणाला तिची दखलहि नव्हती. मीं मुकाट्यानं ती अधेली ठेवून दिली; आठवले यांचं अल्जिब्र्याचं पुस्तक घरांत नकळत जाऊन विकलं. त्याचे सव्वातेरा आणे आले व बाजारांत जाऊन 'केशवसुतांची कविता' विकत आणली. अधीरतेनं घरीं घेऊन आलों

व उघडून पाहतों तों एक शब्दहि कुठें कळेना! पैसे उगाच घालवले असं वाटलं! पण जेव्हां त्यानंतर इतर पुस्तकांच्या बरोबर मी तें शाळेंत घेऊन जाई व वाचण्याचं सोंग करी, तेव्हां त्या पुस्तकाचा मालक म्हणून मला कोण मान मिळे वर्गांत! अल्जिब्ऱ्याचं पुस्तक विकल्यामुळं मला मित्रांकडे जाऊन दररोज उदाहरणं लिहून आणावीं लागत आणि त्यामुळं खूप त्रास होई! पण तीं उदाहरणं टिपून आणायला जातांनाहि मी तें पुस्तक बरोबर नेत असे.

पूर्वींचे गरिबींचे माझे दिवस आतां उरले नाहींत. मी वाटेल तें नवं किंमतवान् पुस्तक विकत घेऊं शकतों. माझ्या फिरत्या बुक-केसमधले वरचे खणच पाहा ना! उत्कृष्ट छपाईचीं, मोहक बांधणीचीं, नयनमनोहर चित्रांचीं व सुवर्णरंगी कडा असलेल्या पानांचीं कितीतरी उंचीं पुस्तकं झळकत आहेत. त्यांच्याकडे क्षणभर दृष्टि फेंकली तरी नजरेंत गर्व भरतो व मान ताठ होते. कलकत्त्याच्या स्टँडर्ड कंपनीनं काढलेले ते लघुकथांचे नयनरम्य ग्रंथ, होम लायब्ररीची 'मॉडर्न सायंटिफिक् थॉट' 'एव्हरीबडीज् बुक ऑफ फॅक्टस्', जगांतील सर्वोत्कृष्ट फोटोंचे सुंदर पुस्तक, 'वंडरफुल इंडिया', कोट्यवधि सुभाषितं अंतःकरणांत बाळगणारा प्रचंड राक्षसी स्टीव्हन्सोनिया, टिळकांचं (न वाचलेलं) गीतारहस्य, ज्ञानकोशाचे अजूनहि न मोजलेले पण रांगेंत उभे असलेले भाग, गिल्बर्ट व सलिवन्च्या ऑपेरांचं सुवर्णरंगी पुस्तक इत्यादि कितीतरी किंमतीचीं व बडींबडीं पुस्तकं आज माझ्या बुक-केसमध्यें व कपाटांत आहेत. पण त्यांच्याकडे दृष्टि जातांच केवळ झगझगीत पोशाखांतील त्रयस्थांकडे दुरून बघावं तसं वाटतं. त्यांच्याबद्दल मनांत कौतुक उत्पन्न होत नाहीं, भावनांना मृदु स्पर्श होत नाहीं अगर पूर्वस्मृतींनीं मन भारावून जात नाहीं. याच्याउलट त्या फाटक्या, मळक्या, चुरगळलेल्या व वरणाचे

व चहाचे डाग पडलेल्या जुन्या पुस्तकांकडे पाहिलं म्हणजे बालपणींचे मित्र भेटल्याचा आनंद होतो; क्षणभर मनाला वर्तमानकाळाचा विसर पडून भूतकाळांतील निरनिराळ्या प्रसंगांभोंवतीं तें गुंजारव करूं लागत व अंतः-करणांत कसलीतरी विचित्र हूरहूर सुरू होते. त्यांत कोणत्या तरी अज्ञात हातानं लिहिलेलीं पुसट वाक्यं एखाद्या प्रेमळ संवगड्याप्रमाणं उपकारक व मार्गदर्शी वाटतात व त्यांचा कधींहि विसर पडत नाहीं.

पुण्याहून इकडे अहमदाबादेस येताना पुस्तकाची जी हालवाहालव करावी लागली त्यांत माझी ती फाटकी पण धड अंतःकरणाची 'निबंधमाला' गहाळ झाली. फक्त एकदोन चुरगळलेलीं पानं सांपडलीं. एखादा जिवलग मित्र गमावल्याचं दुःख मला झालं. एखाद्या सौम्य, शांत पण कोमलहृदयी मित्राप्रमाणं वाटे ती मला. नकळत तिनं मला समंजसपणाचे धडे दिले होते. ज्या ज्या वेळीं शाळेचा अगर अभ्यासाचा कंटाळा येई व आईबरोबर मी भांडे, त्या वेळीं त्या वृद्ध मुसलमान बाईच्या नेत्रांतील अश्रु आठवत, एक-दम दचकल्यासारखं होई, मनाला लाज वाटे अन् मी आपोआप नीट वागे.

आज माझ्या कपाटांत उंची ग्रंथांची फौज उभी आहे. आणखीहि मन-सोक्त भरती त्या फौजेंत मी करूं शकेन; पण—

तो हरविलेला बालमित्र मला परत मिळेल तर केवढा आनंद वाटेल मला ! तोंपर्यंत काळजीपूर्वक आल्बममध्यें चिकटवून ठेविलेल्या त्या दोन चुरगळलेल्या पानांकडे बघत मला मनाचं समाधान करून घ्यावं लागणार ! चुरगळलेल्या दोन मळक्या पानांचं आल्बम जवळ अभिमानानं बाळगण्याचं भाग्य माझ्यासारखं इतर कुणाला लाभलं आहे ?

—( मनोहर )

---

# सैनिक आणि साहित्य १५

परवा 'अमृतबझार-पत्रिकें'त एक गंमतीदार बातमी माझ्या वाचनांत आली. चालू महायुद्धांत आघाडीवर लढणाऱ्या सैनिकांना वाचण्यासाठीं मनोरंजक वाङ्मय सरकारतर्फे पाठविण्यांत आलं. त्यांत धाडसी व शूर शिपायांना आवडावं असं साहसांनीं, संकटांनीं, पराक्रमांनीं भरलेलं रहस्यमय कथावाङ्मय पाठविण्याची व्यवस्था केली होती. पांचट प्रणय-कथा अगर तात्त्विक विचारांनीं भरलेलं गंभीर वाङ्मय हेतुःपुरस्सर वगळ-ण्यांत आलं होतं. विशेषतः देशासाठीं प्राणार्पण करणाऱ्या शूर सैनिकांवर लिहिलेल्या रोमांचकारी कादंबऱ्या व कथा यांचा भरपूर सांठा पाठविण्यांत आला होता. आफ्रिकेच्या जंगलांत केलेलीं साहसं, सहारा वाळवंटांत गुदर-लेले प्राणघातक प्रसंग, हिमालयाचं अत्युच्च शिखर गांठण्यासाठीं केलेले अचाट परिश्रम, दर्यावरच्या चकमकी, हिंस्र पशूंबरोबर केलेली झुंज इत्यादि विषयांवर लिहिलेलं वाङ्मय त्या धैर्यमेरू शूर सैनिकांना अतिशय आवडेल अशी सर-कारची कल्पना !

इतकंच नव्हे, तर जेव्हां सैनिकांसाठीं वाङ्मयाची सरकारतर्फे जनतेकडे मागणी करण्यांत आली त्यावेळीं गंभीर, रुक्ष, चर्चात्मक, तात्त्विकतापूर्ण असलं वाङ्मय कुणीं पाठवूं नये अशी मुद्दाम सूचना दिली होती. पण सैनिकांच्या अभिरुचीबद्दलचा सरकारचा हा अंदाज फसला ! जें जें म्हणून कथावाङ्मय सैनिकांना देण्यांत आलं त्या सर्वांबद्दल त्यांनीं नाकं मुरडलीं. कुणीं रागानं पुस्तकं फाडून टाकलीं, तर कुणीं जवळच पडलेल्या बॉंबच्या अग्नींत त्यांची आहुति दिली; कुणीं त्यांचा दाढीसाठीं उपयोग केला, तर कुणीं तीं समोर धरून त्यांतून बंदुकीच्या गोळ्या मारून त्याबद्दल आपली नापसंती दर्शविली. सैनिकांच्या या वर्तनाबद्दल सर्वत्र आश्चर्य प्रगट करण्यांत आलं !

पण मला मात्र ती हकीगत वाचून कसलंच आश्चर्य वाटलं नाहीं. त्यांना पुरवलेल्या वाङ्मयावर सैनिक चिडले यांत विस्मय वाटण्याजोगं कांहीं नाहीं—नव्हे, मी जर कधीं आघाडीवर गेलों ( म्हणजे कुणीं जर मला चुकून पाठविलं ) व खंदकांत शत्रूकडून सूंसूं करीत येणाऱ्या बंदुकीच्या गोळ्या दिवसभर टाळल्यानंतर दमूनभागून तंबूंत करमणुकीसाठीं एखादं पुस्तक मी उघडूं लागलों व त्यांत शत्रूंच्या बंदुकी चुकवीत धैर्यानं लढणाऱ्या वीरांचं वर्णन असलं, तर त्या कादंबरीचा अगर कथेचा मी दाढीसाठींसुद्धां उपयोग करणार नाहीं किंवा केलाच तर तेवढ्यासाठींच करीन. स्वतः संकटांना तोंड देत जीवन कंठणाऱ्या माणसाला धाडसांनीं भरलेलं वाङ्मय वाचण्याचा प्रसंग यावा याच्याइतकं भयंकर संकट दुसरं कोणतंच नाहीं. कारण—

प्रत्येक पुस्तकाच्या वाचनाला काळवेळ पाहिली पाहिजे. सर्वच चांगलीं पुस्तकं केव्हांहि वाचावीं हें म्हणणं कोणतंहि पुस्तक केव्हांहि वाचावं हें म्हणण्याइतकंच विचित्रपणाचं आहे. तुम्हांला जर चित्रकलेबद्दल थोडीशी मर्मज्ञता असेल, तर तुम्हांला दिसून येईल कीं, जर कलावंताला आपल्या

काळसर वर्णी चित्राला उठाव द्यावयाचा असेल, तर त्यासाठीं तो पांढऱ्या पार्श्वभूमीची योजना करीत असतो. हेतु असा कीं, काळा व पांढरा यांच्या निकट साहचर्यानं चित्राचं सौन्दर्य खुलून दिसावं ! वाचनाच्या बाबतींतहि हाच न्याय लागू आहे. जर तुम्हांला वाचनाचा खरा रसास्वाद चाखायचा असेल, तर पुस्तकांत जें चित्र व वातावरण रंगविलेलं आहे त्याच्या बरोबर विरुद्ध अशा परिस्थितींत तुम्हीं तें हातीं घेतलं पाहिजे. तरच तुम्हांला ग्रंथाची खरी बहार लुटतां येईल.

भर वादळांतून नौका हाकारतांना जर तुम्ही 'रॉबिन्सन क्रूसो' वाचूं लागलांत तर तुम्ही कंटाळून त्या पुस्तकाला सोयिस्कर अशी जलसमाधि द्याल. पण तेंच सकाळच्या गुलाबी थंडींत, अंगावर रुबाबदार पांघरूण घेऊन बिछान्यावर लोळत असतांना तुम्ही तें पुस्तक हातांत घ्या; एखाद्या जादूनं मंत्रमुग्ध करावं अशी वेड्यासारखी स्थिति तें पुस्तक केल्याशिवाय राहणार नाहीं. आरामशीरपणं पडल्या पडल्या क्रूसोच्या विलक्षण धाडसांची, संकटांची व अडचणींची हकीगत वाचतांना जणूं तिचं कधीं कळलं नव्हतं असं महत्त्व जाणल्याचा मनाला भास होतो. शेक्सपियरचं 'मॅक्बेथ' नाटक रात्रीं ऐकांतांत वाचण्याची माझी ताकद होत नाहीं. या नाटकांतलं काळं बेरं वातावरण, त्यांतल्या चेटकिणींच्या भयंकर मुद्रा व उद्गार, बंडखोर मनाचे हिंस्र पराक्रम रात्रींच्या वेळीं आकलन करणं शक्य होत नाहीं. पण सकाळचा गरमागरम चहा घेतल्यानंतर ओटीवर सूर्याचं कोवळं ऊन अंगावर घेत जेव्हां मी तें नाटक उघडतों तेव्हां जणूं कुणीं पडदा दूर करून आंतलं रहस्य दाखवावं असं सर्व नाटक माझ्या रसिक वृत्ति उचंबळून सोडतं.

जेन ऑस्टिनच्या ' प्राइड ॲन्ड प्रेज्युडिस् 'चं मर्म जाणायचं असेल, तर शिकारीनिमित्त तुम्ही रानांत गेलां असतांना झाडाखालीं पडल्यापडल्या

तें वाचूं लागा. जेनच्या लेखणींतली जादू जणूं तुमच्या अंतर्यामांत भिनत आहे असं तुम्हांला वाटूं लागेल. या कादंबरींत चितारलेल्या शांत व सुमधुर जीवनाचा गोडवा रानावनांत हिंडून शिणल्यानंतर खरा चाखतां येईल. मद्याचा प्याला चाखल्यानन्तर मन गोड गुंगींत असतांना तळीरामची रसवंती ऐकली तर ती कशी आनंददायक व्हावी ? पण तेंच बासुंदीचं जेवण जेवल्यानंतर त्याचं वाक्पाटव पाहावं—जणूं नवीनच अर्थानं स्फुरल्याप्रमाणं तें वाटतं !

आपण ज्या परिस्थितींत असतों तिच्या विरुद्ध असलेली परिस्थितीच तेव्हां अधिक प्रिय आपणाला वाटावी अशीच मानवी मनाची रचना आहे. डेस्डेमोनासारख्या कुसुमकोमल सौंदर्यलतिकेचं ऑथेल्लोसारख्या रानवट शिपाईगड्यावर प्रेम बसलं यांतलं इंगीत ओळखणं कठीण नाहीं. जो न्याय प्रणयासारख्या भावनांना लागूं तोच ग्रंथवाचनालाहि समर्पक ठरावा यांत कसलीच नवलाची गोष्ट नाहीं. ग्रंथांत वर्णिलेली परिस्थिति जर वाचनाच्या वेळच्या परिस्थितीसारखीच असली, तर त्या ग्रंथाचं स्वारस्य कळणं शक्य नाहीं. त्याला विरोधी परिस्थितीच आवश्यक आहे.

मी आजारी असलों म्हणजे हटकून प्रवासाचीं वर्णनं वाचीत बसतों. अंगांत ताप असला कीं 'माझा काश्मीरचा प्रवास,' 'माझं जगपर्यटण,' 'माझीं आफ्रिकेंतलीं साहसं,' 'फिफ्टी ॲडव्हेंचर्स दॅट थ्रिल्ड द वर्ल्ड' असलीं पुस्तकं लायब्ररींतून मागवितों. प्रवासांत असतांना 'मेडिटेशन्स ऑफ मार्कस् ऑरेलियस' सारखं सुबोध वचनाचं पुस्तक बरोबर घेतों. आनंदांत असतांना लिअरच्या यातनामय जीवनावरलं नाटक वाचीत बसतों, तर विषण्ण मनःस्थिति असतांना वुडहाउसचा 'जीव्हज' संगती घेतों. केवळ मनाला

विरंगुळा म्हणून हीं पुस्तकं मी वाचीत नाहीं, तर अशा मनःस्थितींत वाचनासाठीं घेतलेल्या पुस्तकांचं रहस्य पूर्णांशानं कळतं म्हणून.

जो खरा रसिक आहे तो ग्रंथवाचनाची वेळ व वातावरण चोखंदळपणानं ठरविल्याशिवाय राहणार नाहीं. जेवणांतील पदार्थांप्रमाणं कांहीं पुस्तकं विशिष्ट वेळा साधूनच वाचायचीं असतात! सकाळीं उठतांच बासुंदी पिणाऱ्या पहिलवानांच्या हकीगती मीं ऐकल्या आहेत; पण बासुंदीची चव अथवा लज्जत त्यांना त्या वेळीं कितपत चाखतां येत असेल याबद्दल मला शंका आहे! बासुंदीची माधुरी चाखायचीं असेल तर रविवारीं बारानंतर प्रयोग करून पाहा आणि मग पहाटे बासुंदीचा रतीब लावणाऱ्या पहिलवानांच्या शरिराचं कौतुक तुम्हाला वाटलं तरी त्यांच्या मेंदूचं तुम्हांला वाटणार नाहीं. पुस्तकांच्या बाबतींतहि हाच विवेक बाळगला पाहिजे. कांहीं माणसं केव्हांहि कोणतंहि पुस्तक वाचूं शकतात. पण असलीं खादाड माणसं निर्बुद्ध आहेत असं बेलाशक समजावं. जर तुम्हांला ग्रंथांची किंमत वाटत असेल, तर त्यांच्या स्वरूपाचा विचार न करतां त्यांना वाटेल तेव्हां कामाला जुंपून उपमर्द करून चालणार नाहीं. ग्रामीण जीवनावरील कथाकादंबऱ्या खाचराच्या बांधावर बसून वाचण्यांत काय फायदा? मुंबईच्या फोर्टमध्यें राहणाऱ्या नायिकेवर लिहिलेली गोष्ट खेडेगावीं कंबळाच्या खोपटांत वाचायला नको का? महाबळेश्वरचं वर्णन माथेरानच्या बंगल्यांत बसून वाचणारी व्यक्ति ठाण्यास राहण्यास योग्य आहे असंच कुणीहि प्रांजलपणें म्हणेल. बालकवीच्या ' फुलराणी'ची व त्याच्या ' निर्झरा'ची जादू पाहायची असेल तर गिरगांवांतल्या कुबट खोलींतच त्या वाचल्या पाहिजेत.

ग्रंथांना कुणींतरी दिव्यौषधि म्हटलं आहे; पण ती केव्हां व कशी वापरायची याबद्दल विवेक सोडून भागणार नाहीं. अमृत उत्तम खरं, पण तेंच

सदैव पीत बसणारा माणूस अजीर्णानं किंवा पोटदुखीनं आटोपणार नाहीं याबद्दल काय हमी द्यावी ? ज्याला साहित्याबद्दल परमादर आहे त्यानं काळ, वेळ व वातावरण यांची योग्य ती निश्चिति केल्याशिवाय वाटेल तें पुस्तक उघडून वाचायला सुरू करणं भूषणास्पद नाहीं खास !

आतां तुम्हांला आघाडीवरचे सैनिक हातीं पडलेलं वाङ्मय पाहून कां चिडले त्याचा उमज पडेल. सकाळीं उठल्यापासून ते रात्रींपर्यंत सदैव मृत्यूच्या जबड्यांत उभे, समोरची बंदुकीची गोळी चुकविण्यासाठीं खंदकांत मान लपवावी तों वरून बॉम्बवृष्टीसाठीं विमान हजर, त्याला टाळण्यासाठीं पळावं तों तिकडून दौडत येणारा रणगाडा प्राण घेण्याला जणूं उत्सुक—अशा चक्रव्यूहांतून जीव बचावून तंबूंत जाऊन कुठं पुस्तक उघडावं तों तिथंहि तोच पळापळीचा व चुकवाचुकवीचा प्रकार ! बिचारे चिडतील नाहीं तर काय !

आफ्रिकेच्या आघाडीवरल्या महाराष्ट्रीय वीरांना जर पार्सल पाठविण्याचा मजवर प्रसंग आला तर मी त्यांत नाथमाधव व हरिभाऊ आपटे यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्या घालण्याचं जसं टाळीन तसंच फडक्यांच्या जवळजवळ सगळ्या कादंबऱ्या अगदीं आठवणीनं घालीन. पार्सल पोचल्यानंतर खूष झालेल्या सैनिकांचं मला काय पत्र येईल याबद्दल मला शंका नाहीं. आनंद न मावलेल्या स्थितींत ते लिहितील:

“ काय मजेदार लिहितो हो हा फडके ! आम्ही महाराष्ट्रांत असतांना वर्ष सहा महिन्यांपूर्वी त्याचं नांव कधीं ऐकलं होतं. पण त्याचं लिहिणं असं खुमासदार असेल असं वाटलं नव्हतं ! तोफा-बंदुकीच्या तडाख्यांतून निसटून आम्ही तंबूंत आलों कीं सर्वजण त्यांच्या कादंबऱ्यांवर तुटून पडतों. ‘ आशा ’ कादंबरी तर आम्हांला बेफाम आवडली ! नायक विलासला म्हणे टेनिस व गोंडस पोरी यांच्याशिवाय दुसरं कांहीं माहीत नव्हतं ! बस्स !

बस्स ! नायक असावा तर असा ! नाहींतर त्या लढाईच्या, धरपकडीच्या गोष्टी ! जर या तोफा-बंदुकीच्या माऱ्यांतून नशिबानं वांचून घरीं परत आलों तर आपण तुमच्या फडक्यांची गांठ घेणार ! त्यांना आमचा रामराम कळवा!"

ज्या माणसाला लेखक म्हणून ख्याति मिळवायची असेल त्यानं कोणत्या स्थळीं व काळीं, कोणत्या परिस्थितींत आपली कादंबरी वाचावी याचा प्रारंभीं खुलासा करावा. कारण ग्रंथवाचन योग्य त्या तंत्रानुसार व्हावं यांतच सर्व साहित्यसेवेची कीर्ति सांठविलेली नाहीं का? नाहींतर 'अमृतबझार-पत्रिकें'त वर्णिलेल्या सैनिकांनीं जशी त्यांना पुरविलेल्या साहित्याची दशा केली तशी तुमच्या लिखाणाची व्हायची !

—( मनोहर )

———

# शाप

१६

ज्ञानवृक्षाचं फळ तोडल्याबद्दल ॲडम आणि त्याची पत्नी यांना शिक्षा झाली ही कथा पुन्हां वर्णून सांगायला पाहिजे असं नाहीं. सर्व सुशिक्षित जगाला ती परिचित आहे. पण ॲडमच्या त्या कृत्याचा जो पौराणिक पद्धतीनं निषेध केलेला आढळतो तो मला पटत नाहीं. 'एखाद्या वस्तूला हात लावूं नको, नाहींतर तुझं नुकसान होईल !' असं सांगितल्या-नंतर न कळण्याइतका ॲडम कांहीं भावबंधनांतला मोरू नव्हता. त्या स्वर्गीय बागेंत हिंडून फिरून मनस्वी कंटाळा आल्यामुळंच त्यानं हें कृत्य जाणूनबुजून केलं असावं असं मला कधीं कधीं वाटूं लागतं. ते नेहमींचे लताकुंज व रसदार फळांनीं डवरलेले वृक्ष ! तो नेहमींचाच पुष्पसुगंध अन् तोच पांखरांचा किलबिलाट ! ना कुणी बोलायला, ना चालायला ! बायको-बरोबर गप्पा तरी कसल्या माराव्या ? त्या बागेंत कुणी चोर शिरून जरा गंमतगोंधळ करील तर तेवढाच चर्चेचा विषय ! पण त्या स्वर्गीय वाता-

वरणांत सगळेच पुण्यात्मे ! तिथलीं फळं चोरायला कोण येणार ? आंब्यांना पाड लागलेला पाहून कुणी धोंडा फेकील अन् मग त्याला पकडूं तर त्याचीहि आशा करायला नको ! बिचारा त्या बागेंत हिंडूनहिंडून कल्पनेबाहेर कंटाळून गेला असला पाहिजे आणि त्या वैतागाच्या भरांत तेथल्या सुखमय वातावरणाचा वीट येऊनच कीं काय मज्जाव केलेल्या त्या झाडाचं फळ तोडण्याचं त्यानं सोंग केलं व स्वर्गाच्या त्या तुरुंगांतून आपली चतुराईनं सुटका करून घेतली !

ॲडमप्रमाणं आपणालाहि जर असंच सुखपूर्ण स्वर्गीय वातावरणांत कुणीं कोंडलं, तर त्याच्याप्रमाणंच आपणहि कांहींतरी लटपट करून तेथून आपली सुटका करून घेण्याचा प्रयत्न केल्याशिवाय राहणार नाहीं. स्वर्ग काय अन् पृथ्वी काय ! ज्या वातावरणांत गडबड नाहीं, गोंधळ नाहीं, आश्चर्य नाहींत किंवा अनिश्चितता नाहीं, त्या वातावरणाचा कंटाळा यायचाच ! आपल्या पुराणांत संतापी वृत्तीच्या ऋषींनीं निरनिराराळे शाप दिल्याचं आपण ऐकतों; पण त्या शापांत सर्वांत भयंकर शाप कोणता, असं जर कोणीं मला विचारलं, तर "अमरत्वाचा" असं मी चट्कन् सांगेन ! हातांत बॅट घेऊन मैदानांत उतरणाऱ्या खेळाडूला जर कुणीं म्हटलं कीं, "उगाच त्या खडूनं लेग-स्टंप वगैरे घेण्याच्या यातायातींत पडूं नकोस ! आज तुला औट घ्यायचं नाहीं असं ठरलं आहे !" तर कोणता खेळाडू उन्हांत घामाघूम होण्याचे श्रम घेईल ? चटकन् आपल्या हातांतले ग्लव्हज् टाकून देऊन तो परत तंबूंत बसेल ! तंबूतून बाहेर पडतांना ज्या अनिश्चित मनःस्थितींत तो असतो त्यांतच त्याच्या सर्व उत्साहाचं व महत्त्वाकांक्षेचं तेज सांठलेलं असतं. आलेल्या पहिल्या चेंडूला तो सीमेबाहेर पाठवील किंवा त्या पहिल्याच चेंडूनं त्रिफळा उडून आपणाला परतावं लागेल असली मनोवृत्ति असतांना तो

खेळायला सुरवात करतो, म्हणून तर तो उन्हातान्हाची पर्वा करीत नाहीं. आपल्या मार्गांत ज्या अदृश्य अडचणी लपून बसलेल्या आहेत त्यांना टाळून विजय मिळवावयाचा असली वीरश्रीची धमक त्याच्या मनांत असते म्हणून तर तो इतका जागरूकपणें प्रत्येक चेंडू निरखून खेळण्याची यातायात करतो !

मानवी जीवित तरी असंच नाहीं कां ? या जगांत फिरतांना मृत्यु सहस्र मार्गांनीं आपणांवर छाप टाकण्यासाठीं तयार आहे या कल्पनेंतच जीविता-बद्दलची उत्कट प्रीति केंद्रित झालेली आहे. मातेला मुलानं बिलगावं त्याप्रमाणं प्रत्येकजण जीविताला बिलगूं पाहतो याचं कारण मृत्यूनं जीव-नांत निर्माण केलेली विलक्षण गोडी हेंच नव्हे कां ? जर क्षणभर माणसाला संशय आला कीं, जीवनाच्या या क्रिकेटमध्यें मृत्यूनं अगदीं सोइस्कर असं बोलिंग करण्याचं ठरविलं तर जीवितांतलं सगळं काव्य नष्ट होऊन पृथ्वीला स्मशानाची कळा येईल ! शेजारीं कोचावर बसलेली प्रियतमा ही निरंतर राहणार आहे हें कळतांच काव्य आणि चुंबन यांचा पायाच कोस-ळेल, नाहीं कां ? जें सौंदर्य सदैव ताजं राहणार त्यावर शिळं काव्य कुणीं करावं ? जीं पुष्पं कोमेजणार नाहींत त्यांच्या यौवनाची कदर कुणाला वाट-णार ? नेत्रांत भरणारं सौंदर्य भंगुर आहे म्हणूनच त्यांना अमरत्व देण्या-साठीं कविप्रतिभेची धडपड चाललेली असते ! लाभलेला सहवास क्षण-मात्राचा आहे या सत्यांतच त्यांतली सर्व उत्कटता सामावलेली आहे ! हृदयाची ही धडधड अशीच टिकणार नाहीं या भावनेमुळंच हृदयाचं इतकं कौतुक चालतं ! वाऱ्यावर वाहत आलेली संगीत लकेरी तशीच टिकून राहिली तर क्षणमात्र थबकून तिचं चिंतन करीत कोण बसणार ? बिचारा ॲडम ! त्या वैचित्र्यशून्य वातावरणाला कंटाळला आणि कसलं

तरी निमित्त पुढं करून त्यानं त्या कारागृहांतून आपली मोकळीक करून घेतली !

अमरत्वासारखं कंटाळवाणं मरण दुसरं नाहीं हें खरं असलं तरी मृत्यूची भीति बाळगणारे लोक या जगांत थोडेथोडके नाहींत. बहुतेकजण मृत्यूची कल्पना काढतांच भेदरून जातात ! जणूं कांहीं तो आपला एक दुष्ट शत्रुच आहे ! वास्तविक मृत्यूची भीति वाहणारे लोक असा विचार करीत नाहींत कीं, जर पांच हजार वर्षांपूर्वी जगांत व्यवहार चालले असतांना आपलं जगावांचून व जगाचं आपल्यावांचून कांहीं अडलं नव्हतं, व आणखी दोन हजार वर्षांनींहि असंच आपल्यावांचून जगाचं चक्र फिरत राहणार याबद्दल तिळमात्र शंका नाहीं, तर त्या वेळीं आपण असणार नाहीं याबद्दल आपण एवढी फिकीर कां करावी ? कालिदासानं 'शाकुंतल' लिहिलं त्या वेळीं आपण शकुंतलेच्या लावण्याची कीर्ति ऐकून कण्वाच्या आश्रमाबाहेर तिच्या दर्शनासाठीं घोटाळत उभे नव्हतों ! अशोक राजानं आपल्या जयस्तंभांची उंची ठरवितांना आपला सल्ला विचारला नव्हता ! सिंहगडावर हल्ला करतांना ' तरवार हातांत घेऊन पुढं व्हा ' असं कुणी आपणाला सांगायला आलं नव्हतं ! शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकाचा समारंभ आपल्यावांचून थोडाच आडून राहिला होता ? सदाशिवरावभाऊंनीं आपल्याला न विचारतां दिल्लीचं छत फोडलंच ना ! पण एवढं लांब जायची जरूर नाहीं ! अगदीं परवा परवा चिपळूणकरांनीं ' निबंधमाला ' काढली त्या वेळीं माझ्याकडे वर्गणीदार म्हणून कधीं एखादा अंक पाठविला होता ? राष्ट्रीय सभेचं पहिलं अधिवेशन भरलं त्या वेळीं आपण हजर कां नाहीं म्हणून ह्यूमसाहेबांनीं थोडीच चौकशी केली ? चाफेकरबंधूंनीं रँडसाहेबावर जी गोळी घातली तिच्या आवाजानं आपण थोडेच झोंपेंतून जागे झालों ?

भूतकाळांत याप्रमाणं असंख्य लहानमोठ्या घडामोडी चालू असतांना कुणीं आपल्याला झोपेंतून जागं केलं नाहीं, ' काम करायला उठा ' म्हणून तसदी दिली नाहीं. जर आपल्या जन्मापूर्वींचं जग आपल्यावांचून अडून राहिलं नव्हतं, तर आपल्या मृत्यूनंतरहि त्याचा व्यवहार पूर्ववत् सरळ चालणार; आपल्या मरणामुळं त्याच्या गतींत रतिमात्र बदल होणार नाहीं, अशी कल्पना करून मृत्यूबद्दलची भीति मनांतून काढून टाकणं शहाणपणाचं नव्हे कां ?

मृत्यु म्हणजे तरी काय ? आपण जन्माला येण्यापूर्वी ज्या स्थितींत होतों त्याच स्थितींत परत नेणारी एक शक्ति म्हणजे मृत्यु. जर दोन हजार वर्षांपूर्वी आपण जन्माला आलों नाहीं म्हणून आपल्याला खंत वाटत नाहीं, तर आज ना उद्या आपण या जगाचा निरोप घेणार या कल्पनेंत भेदरून जाण्याजोगं असं काय आहे ?

यावर कुणी असं म्हणतील कीं, भविष्यकालाबद्दल माणसाला नेहमींच कुतूहल राहणार! भूतकाळांत काय गोष्टी घडल्या त्या वाचून किंवा ऐकून तरी त्याला माहीत असतात; पण भविष्यांत काय काय आहे याची अंधुक जाणीवहि त्याला नसते; तिच्याबद्दल कुतूहल सदैव वाटणारच ! पण हें स्पष्टीकरण मला पटत नाहीं. अज्ञात गोष्टीबद्दल माणूस जर नेहमींच उत्सुक असतं, तर आळशीपणांत काळ न घालवितां त्यानं अज्ञाताचा पडदा फाडून आंत डोकावण्यासाठीं जिवापाड मेहनत केली असती ! खरी मौज अशी आहे कीं, ज्या वर्तमानकाळीं माणूस जिवंत असतो तो वर्तमानकाळ सोडून जाणं त्याच्या जिवावर येतं व म्हणून तर आपली जगण्याची इच्छा लपविण्यासाठीं तो असं अज्ञाताबद्दलच्या कुतूहलाचं सोंग पुढं करीत असतो. ज्या जमिनीवर आपण उभे आहोंत तिच्यावरून आपला पाय सरकूं नये

अशीच आपली इच्छा असते. भूत अथवा भविष्य यापेक्षां वर्तमानकाळांतच आपल्या जीवनप्रीतीचीं मुळं रोवलेलीं असतात; म्हणूनच माणसाला पायाखालची जमीन दुभंगूं नये अशी इच्छा असते.

कवींनीं तारुण्याची अनेक तऱ्हेनं महति गाईलेली आहे, पण तारुण्याची महति मला एवढ्याचसाठीं वाटते कीं, त्या उन्मादांत माणसाला मृत्यूची चुकूनहि आठवणदेखील होत नाहीं ! अंगांत गरम रक्त सळसळत असतांना रोजचा उगवता सूर्य वीरवृत्तीला अंकुश मारून जीवनावरील प्रीति क्षणोक्षणीं वाढवीत असतांना मृत्यूची पिशाच्चाकृति आठवूं नये यांत नवल नाहीं. जर त्याची आठवण झालीच तर ती दूर डोंगरावरलं एखादं दृश्य अंधुकपणें दिसावं अशा तऱ्हेची ! कुठं तरी दूरदूर क्षितिजावर किंवा अंधाऱ्या दरींत तो उभा असावा असं त्यावेळीं वाटत असतं. तो खूप लांबवर उभा आहे, ती वाट तोडून आपल्यापर्यंत येईतों बिचारा अगदीं गळून जाईल, या भावनेनं आपण विश्वकुंजांत आनंदानं खेळत राहतों. तो आज ना उद्यां या कुंजावर छापा घालणार ही जाणीव सामान्यतः उतार वयांत होऊं लागते. ज्या वेळीं गरम रक्त कोमट होऊं लागतं, हातपाय हालावयाला नाराज असतात, ज्यावेळीं अवयवांत एक प्रकारचा जडपणा शिरतो, त्यावेळीं मृत्यूची स्वारी हळूहळू पण निश्चितपणें येत आहे याची भीतिदायक खात्री माणसाला वाटूं लागते. पण तो येत आहे हें पाहून तो पोंचायच्या आधीं सुरू केलेला खेळ अधिकच उत्साहानं खेळणं यांतच खरा खिलाडूपणा आहे. चार तासांनीं नाटक संपणार हें माहिती असतं म्हणून तर माणूस स्टेजवरच तो देखावा कौतुकानं पाहत असतो—नव्हे शेवटचा अंक नेहमीं इतका रंगतो याचं कारण त्यानंतर अंक नसतो हेंच नव्हे कां ? मग मृत्यूच्या

आगमनाची चाहूल लागतांच आपला महोत्सव आटोपता घेण्याचं कांहीं कारण दिसत नाहीं.

परवांच माझ्या घरीं काहीं साहित्यिक मंडळी चहासाठीं जमली होतीं. बोलतां बोलतां आधुनिक सुधारणेबद्दल चर्चा सुरू झाली. आणि 'आधुनिक सुधारणेचा सर्वांत विलक्षण दुष्परिणाम कोणता झाला?' असा प्रश्न कुणींतरी काढला. त्या वेळीं मला निश्चित उत्तर देतां आलं नाहीं. पण आतां दुष्परिणाम कोणता असं मला कुणीं विचारलं तर त्याचं उत्तर माझ्या जिभेवर आहे. माझ्या मतें आधुनिक सुधारणेचा सर्वांत त्रासदायक दुष्परिणाम म्हणजे वाचनालेखनाच्या या निष्क्रिय युगांत क्षयरोग्यानं क्षीणपणें श्वासोच्छ्वास करावा त्याप्रमाणं जीवनाबद्दल माणसाला वाटणारी दुबळी आसक्ति! एक काळ असा होता कीं, अलौकिक धाडसाचीं कृत्यं करण्यांत माणसाला धन्यता वाटे. एक कसलं तरी वेड डोक्यांत घेऊन त्यासाठीं प्राणाची पर्वाहि न करणारीं तीं खरीं जिवंत माणसं कुणीकडे अन् केवळ नाटक–सिनेमा पाहणं हेंच जिथं ध्येय झालेलं तें आजकालचं जिणं कुणीकडे! असलं निष्क्रिय जिणं माणूस घालवूं लागला कीं रोग्यानं बिछान्याला चिकटून बसावं त्याप्रमाणं मानव जीवनाला रोगट आसक्तीनं कवटाळूं लागतो. एखाद्या कल्पनेसाठीं आपल्या जीविताची आहुति देणारीं माणसंच जिवंत असतांना आयुष्याचा खरा उन्मादक आनंद भोगूं शकतात; पण ना काम, ना धंदा, ना संकट, ना शत्रु अशी स्थिति असली कीं माणूस बुरसून जाण्याची भीति असते. नंदनवनांतल्या त्या अॅडमची रोजचं तेंच तें ठराविक वातावरण पाहून पिसाटल्यासारखी स्थिति झाली असली पाहिजे. नको तें स्वर्ग–संगीत, त्या वासंतिक वायुलहरी, तीं अमृतमय रस-

दार फळं अन् ते सदैव फुललेले फुलांचे ताटवे ! एक दिवस संतापून जाऊन स्वारीनं विचार केला असला पाहिजे अन् जाणूनबुजून ज्ञानवृक्षाचं तें फळ त्यानं तोडलं असलं पाहिजे ! तें फळ तोडलं तर कोणता शाप भोगावा लागेल याची त्याला स्पष्ट समज दिलेली होती. पण अमरत्वाच्या शापांतून मुक्त होण्यासाठीं तो उत्सुक झाला होता. अमरत्वाचं रडकं जिणं त्याला नको होतं !

नाहींतर त्या बागेंत हजारों फळझाडं पडलीं असतांना तें एकच फळ तोडण्याचा आधाशीपणा त्यानं केला नसता !

—( किर्लोस्कर )

